# एकादशी



भा. वि. वरेरकर




बा. द. सातोस्कर, बी. ए.

मुंबई १९४४

## आमचें ताजें प्रकाशन

# एकादशी

( कथासंग्रह )

भा. वि. वरेरकर

०

# निशिकांतची नवरी

( नाटिका–दुसरी आवृत्ति )

प्रा. अनंत काणेकर

०

## आगामी प्रकाशन

# निळें आकाश

( कादंबरी )

प्रा. लक्ष्मणराव सरदेसाई

०

# निसर्ग

( कथासंग्रह )

व्यं. अ. पै रायकर

सागर साहित्य

२०, त्रिभुवन रोड, मुंबई ४.

# कुठं गेला आह् वी ?

सिंगापूर पडल्याची बातमी येऊन कांहीं दिवस झाले होते. सिंगापूरची लढाई सुरू होण्यापूर्वी सिंगापूराहून निघालेले हिंदी आणि चिनी लोक हिंदुस्था-नांतल्या निरनिराळ्या भागांतून येऊं लागले होते. कोणत्या ना कोणत्या तरी लढाई सुरू असलेल्या प्रदेशांतले बरेचसे चिनी लोक मुंबईला येऊन पोंचले होते. यांत श्रीमंतांप्रमाणेंच गरिबांचाही भरणा होता. संपन्न स्थितींत असलेले चिनी पहाण्याचा मुंबईंत तरी क्वचितच योग येतो. आमच्या ओळखीचे चिनी म्हणजे चायना सिल्कचे फेरीवाले. आजवर या लोकांवरूनच आम्ही चिनी जनतेबद्दल सर्वसामान्य कल्पना बसवीत होतों.

पण अलिकडे जेव्हां युरोपियनांइतकेच फॅशनेबल दिसणारे, युरोपियनां-सारखाच हुबेहुब पोशाख करणारे, आमच्याइतकंच चांगलं इंग्रजी बोलणारे चिनी मुंबईंत येऊं लागले, तेव्हां चिनी लोकांबद्दलच्या आमच्या जुन्या कल्पना बदलूं लागल्या.

ऑपेरा हाऊसच्या ट्रॅम नाक्यावर ट्रॅमची वाट पहात मी उभा होतों. इतक्यांत एक चिनी, घोटाळलेल्या आणि बावरलेल्या मुद्रेनं इकडेतिकडे पहात, कुठला तरी रस्ता शोधण्याचा प्रयत्न करीत असावा, असं मला दिसून आलं.

रस्त्यावरून कितीतरी माणसं जात होतीं, मोटरी जात होत्या, व्हिक्टोरिया जात होत्या, तितक्यांत एक ट्रॅमसुद्धां निघून गेली, तरीही तो चिनी इकडे तिकडे पहात घोंटाळत होता. त्याचं निरीक्षण करीत असतांना माझी एक ट्रॅम चुकली. दुसरी ट्रॅम अजून आली नव्हती.

माझी चौकस बुद्धि जागी झाली. मी त्या चिनी माणसाकडे जाऊन त्याला इंग्रजींत विचारलं. एक क्षणभरच तो माझ्याकडे पहात राहिला.

मलबार हिलवर येऊन राहिलेल्या संपन्न चिनी लोकांप्रमाणें जरी त्याचा पोषाख नव्हता तरी त्याची मुद्रा पाहून तो माणूस सामान्य नसावा असं मल वाटलं. त्याच्या बारिक डोळ्यांतून बुद्धिमत्तेचं तेज फांकत असलेलं दिसून येत होतं. त्याची दृष्टि मोठी तीक्ष्ण होती. त्यानं चट्‌कन वळून माझ्याकडे पाहिलं त्यावेळीं मी क्षणभर दबकल्यासारखा झालों. तो बोलत नाहीं असं पाहून मी पुन्हां विचारलं, तेव्हां त्यानं उत्तर दिलं—पण तें उत्तर मोडक्या तोडक्या इंग्रजींत होतं. मलबार हिलवर येऊन राहिलेले चिनी चांगलं विशुद्ध इंग्रजी बोलत असत. हा माणूस त्यांच्या दर्जाचा नसावा असा मला संशय आला.

तो म्हणाला, "No aim–going anywhere." (नक्की नाहीं कुठं तरी जातोंय.)

मी म्हटलं, "मलबार हिलवर कांहीं चिनी आहेत. तिकडे तुम्हांला पोंचवूं का ?—" मी इंग्रजींत बोलत होतों. पण प्रत्येक शब्दाचा स्पष्ट उच्चार करीत होतों.

त्याच्या कपाळाला आंठ्या पडल्या. "No. No." म्हणून तो एकदम चालूं लागला. मीही त्याच्याबरोबर चालूं लागलों

तो माझ्याकडे पहात नव्हता. पण मी केलेल्या उल्लेखाचा त्याला राग आला असावा असं मला वाटलं. कां असं वाटलं त्याला ?

मी त्याचा हात धरून त्याला थांबवलं आणि म्हटलं, "कुठं जाणार आहांत ?"

तो थांबला. त्यानं माझ्याकडे पाहिलं—अगदीं केविलवाण्या नजरेनं पाहिलं. त्या केविलवाणेपणांतसुद्धां त्याच्या अंतरांतला स्वाभिमान स्पष्ट दिसून येत होता.

त्यानं नुसतं माझ्याकडे पाहिलं आणि नजर वळवली.

घाईघाईनं पावलं उचलीत तो पुढं चालूं लागला. रस्त्याकडे त्याचं लक्ष नव्हतं. हात धरून मी त्याला मागं ओढलं नसतं तर तो मोटारखालींच सांपडला असता.

"धन्यवाद." तो स्वच्छ मराठींत म्हणाला. पण तें मराठी नव्हतं. नंतर मला कळून आलं, कीं त्याला संस्कृत चांगलं येत होतं.

त्या उद्गारामुळं मी चमकलों असं पाहून तो हंसला. तें त्याचं हंसणंसुद्धां केविलवाणं होतं.

मी त्याला पुन्हां विचारलं, "मलबार हिलवर पोचवूं का?"

तो जवळ जवळ चिडून म्हणाला, "No, No. I not go there. (नाहीं नाहीं. मी तिकडे जाणार नाहीं.)

"मग माझ्या घरीं येतां का?" मी विचारलं. तो इवलंसं हंसला आणि गंभीर होऊन म्हणाला, "होय"

माझं घर तिथून फारसं दूर नव्हतं—घर म्हणजे माझं बिऱ्हाड—म्हणजे माझा ब्लॉक.

एका चिनी माणसाला घेऊन मी आलों आहें असं पाहून घरची सारी मंडळी-अगदीं गडीसुद्धां—धांवतच बाहेर आले.

दिवाणखान्यांत येतांना तो क्षणभर उंबरठ्यावर उभा राहिला—जसं कांहीं आंत यावं कीं न यावं याचा निश्चय त्याला करतां येत नव्हता.

तितक्यांत समोर त्याची नजर गेली. एका कोपऱ्यांत बुद्धाची एक लहानशी मूर्ति होती. मी कांहीं बुद्धाचा मोठा भक्त होतों असं नव्हे. पण दिवाणखान्याच्या शोभेसाठीं मी ज्या कांहीं चार पांच मूर्ति घेतल्या होत्या त्यांतलीच ती एक होती एवढंच.

ती मूर्ति पहातांच त्याची दृष्टि एकाग्र झाली. तो सारं कांहीं विसरला. त्याला पहायला जमलेला आमच्या घरचा घोळका देखील त्याला दिसला नाहीं. तो सरळ त्या मूर्तिसमोर जाऊन उभा राहिला, आपल्याशींच कांहीं पुटपुटला, आपल्या पद्धतीप्रमाणें त्यानं नमस्कार केला आणि नंतर त्यानं मान वळवून आम्हां सर्वांकडे नजर फेंकली.

आतां त्याचा चेहरा प्रसन्न झाला होता. मुद्रेवरचा केविलवाणेपणासुद्धां पार निघून गेला होता. सर्वांकडे त्यानं अगदीं तोंडभर हंसत पाहिलं.

त्याची पहिली नजर गेली ती माझ्या छोट्या मुलीवर. लिलीसुद्धां त्याला पाहून तोंडांत बोट घालून आपले बारीक डोळे टवकारून पहात होती.

लिली जरा नकटी होती. तिच्या चेहऱ्याची ठेवण थोडीशी चिनी थाटाचीच होती. म्हणून तिला आम्हीं 'ॲना मे वाँग' म्हणत असूं.

तो तिच्यासमोर येऊन उभा राहिला तेव्हां बाकीचीं मुलं घाबरून मागं सरलीं. लिली वांकडी मान करून डोळे मिचकावीत गोड गोड हंसत होती.

तो गुडघ्यावर बसला — अगदीं डोळे फाडून तिच्याकडे पाहूं लागला— जसा कांहीं त्याचा सारा जीव डोळ्यांत आला होता.

हळूच लिलीनं त्याचं नाक आपल्या चिमटींत धरलं आणि ती उद्गारली, "ॲना मे वाँग!"

त्याचं हृदय भरून आलं. त्याच्या डोळ्यांतून मोठमोठीं टिपं गळूं लागलीं. त्यानं चट्‌कन लिलीला कवटाळून धरलं आणि तो पटापट तिचे मुके घेऊं लागला.

त्याच्या डोक्यावर हात ठेवीत लिली म्हणत होती, "चु चिन् च्याउ!" तो सारखा हंसत सुटला. हंसतां हंसतां त्याच्या डोळ्यांतून आणखी टिपं गळूं लागलीं.

अशीच त्याची एकादी मुलगी होती का? लढाईच्या धुमश्चक्रींत कुटुंबाची ताटातूट झाल्यामुळं ती त्याला पारखी झाली होती का?

तो मोडक्या इंग्रजींत बोलत होता. त्याचा सारांश असा होता— अशीच माझी एक मुलगी होती—एकच मुलगी होती. चुंगकिंगमधें मुलीला आणि बायकोला ठेवून तो सिंगापूरला गेला होता. सिंगापूरावर टोळधाड आल्यामुळें गांव सोडून पळणाऱ्या लोकांबरोबर तोही निघाला होता. निघायच्याच दिवशीं त्याला कळलं, कीं त्याच्या घरावर बाँब पडून बायको आणि मुलगी मरून गेली.

पुष्कळ बोलावं असं त्याला वाटत होतं. पण मला स्पष्ट शब्दांत सांगतां येण्याजोगी कोणतीच भाषा त्याला येत नसावी.

लिलीला उचलून घेऊन तो कोचावर बसला. अस्मान ठेंगणं झाल्यासारखं त्याला वाटत होतं. पहिल्याच भेटीला लिलीही त्याच्यावर खुष झाली होती. त्यानं आपल्या तुमानीच्या खिशांत हात घालून पाहिलं. कसल्या तरी विचित्र मण्यांची एक माळ काढून त्यानं ती लिलीच्या गळ्यांत घातली. त्याच्याच

मुलीची तर ती माळ नसेल ?

क्षणभर मी शहारलों. भलत्याच कल्पना माझ्या मनांत येऊं लागल्या. पण तो मात्र अगदीं खुषींत आला होता. चिनी भाषेंत तो लिलीशीं बोलत होता. त्याचं अनुकरण करून लिली जी भाषा बोलत होती ती माझ्या कानाला थेट चिनीसारखी वाटली.

जशीं कांहीं त्यांचीं प्रश्नोत्तरं चालू झालीं होतीं. तो सारं जग विसरून गेला होता. जसा कांहीं तो आपल्याच घरीं बसला होता—जसा कांहीं आपल्याच मुलीशीं बोलत होता.

बाकीचीं मुलं दाराआडून डोकावून पहात होतीं. सर्वांनाच त्याची भीति वाटत असावी.

किती तरी वेळ तो लिलीशीं खेळत बसला होता. चहाची ट्रे घेऊन विट्ठल गडी आला ते पाहून मलाही समाधान वाटलं.

दूध किंवा साखर घातल्याशिवाय त्यानं नुसताच चहा पेल्यांत ओतून घेतला आणि तो पिऊं लागला. तेव्हां लिली त्याचा हात धरून म्हणाली " दूध—छाकल ! "

एक घोट घेऊन पुन्हां त्यानं कप तोंडाशीं नेला तेव्हां लिलीनं सारखी मान हालवीत त्याचा कप ओढून घेतला, चमच्यानं थोडी साखर घेऊन तिनं आंत टाकली—तेव्हां त्यानंही थोडंसं दूध त्या चहांत टाकलं.

चहा घेऊन झाल्यानंतर तो भानावर आला. आणि माझ्याकडे वळून 'आतां जातों' म्हणाला. 'कुठं जाणार ?' असं मी विचारलं तेव्हां त्याची मुद्रा पहिल्यासारखीच केंविलवाणी झाली.

" इथंच रहा ना ! " असं मी म्हटलं त्यावेळीं " No. No. " म्हणून एकदम उठून तो निघून जाऊं लागला. मी हात धरून त्याला पुन्हां बसवून घेतलं.

लिली अजून तिथंच उभी होती. तो बसला असं पाहून ती पुन्हां त्याच्या मांडीवर जाऊन बसली—

आणि मग मात्र त्याचा जाण्याचा निश्चय ढांसळला.

" आतां इथंच रहा. " असं मी इंग्रजींत म्हटलं त्याचा भावार्थ समजूनच

कीं काय लिली म्हणाली, "नाई ज्यायचं !"

*　　　*　　　*　　　*

आह् वी आमच्याकडेच राहिला.

माझ्या पत्नीला तें आवडलं नाहीं. म्हणजे तिला पाहुण्यांचा कंटाळा होता असं नाहीं. तिच्या माहेरचीं कुणी माणसं आलीं असतीं तर ती खूष झाली असती, माझे कुणी दोस्त आले असते तर तिनं कुरकुर केली नसती, अनोळखी असणारा मराठी भाषा बोलणारा कुणीही आला असता तरी नाइलाजानं कां होईना, तिनं असंतोष प्रगट केला नसता.

पण हा चिनी ! चिनी म्हणतांच कसला तरी ओंगळवाणा माणूस अशी कल्पना आमच्या बायकांना होते. आम्हांलासुद्धां चिनी बायकांबद्दल फारशी आपुलकी वाटत नाहीं. पण परवां चांग काई शेक हिंदुस्थानांत येऊन गेला, पंडीत जवाहरलालची आणि त्या दंपत्याची मोठी दोस्ती आहे हें जगजाहीर झालं, तेव्हांपासून चिनी माणसाकडे पहाण्याची आमची नजर बदलली गेली. पांच वर्षं चीन-जपान युद्ध सुरू आहे पण आम्ही त्याची कुठं कदर केली होती ? आतां चांग काइ शेक इथं आला, बर्मारोडची ती भानगड आम्हांला कळली, हिंदुस्थानचा आणि चीनचा कुठंतरी मोठ्या जिव्हाळ्याचा संबंध आहे याचं प्रत्यंतर मिळालं, तेव्हां कुठं चिनी हा प्राणी ओंगळवाणा नाहीं असं आम्हांला वाटूं लागलं.

गोऱ्या साहेबापेक्षांदेखील चिनी आम्हांला परका वाटे. तसं पाहिलं तर गोरा तरी कुठं आम्हांला परका वाटतो ? त्यांचं आमचं असं कांहीं विलक्षण नातं जुळून आलं आहे, कीं त्यांना परके तर म्हणतां येत नाहींच, पण आपले म्हणायलाही भीति वाटते. नुसत्या गोऱ्या कातडीमुळं इंग्लिशमन, जर्मन, इटालियन वगैरे झाडून साऱ्या युरोपियनांना आम्हीं एकाच नजरेनं पहात असूं. तोंड उघडून बोलूं लागल्याशिवाय हा साहेब म्हणजे 'आमचा साहेब' नव्हे हें आम्हांला कळत नसे.

तसं चिनी जपान्यांचं नव्हतं. चिनी, जपानी आणि ब्रह्मी तिघेही आम्हांला जवळजवळ सारखेच वाटत. त्यांतून ब्रह्मी लोकांची वस्ती मुंबईत फारच थोडी—जवळ जवळ नाहींच. जपानी होते ते बहुतेक भारे मोटरींतून फिरणारे

किंवा दंतवैद्य. चिनी म्हणजे चिनाई रेशमाचे फेरीवाले–कुणीतरी आमच्या कुणब्यासारखेच—असं वाटत असल्यामुळं माझ्या पत्नीला आह् वीला मी आपल्या घरीं ठेवून घेतल्याचं पटलं नाहीं.

पण लिली मात्र त्याच्यावर बेहद्द खूष होती. तो आल्यापासून तिनं आमच्याशीं जवळ जवळ फारखत केलं होतं. तोच तिला आंघोळ घालायचा, कपडे करायचा, पावडर लावायचा,—जेवायलासुद्धां ती त्याच्या शेजारींच बसत असे.

आह् वीला पंक्तीला घेऊन मी जेवायला बसत होतों हें माझ्या पत्नीला पहिल्यानं पटत नसे. पण रोज चालत असलेली त्याची पूजा अर्चा पाहून चार दोन दिवसांतच तिचं तें वैषम्य निवळलं. आमच्या घरांत असलेलीं संस्कृत पुस्तकं घेऊन तो वाचूं लागला तेव्हां सर्वांनाच त्याच्याबद्दल आपुलकी वाटूं लागली. माझा मोठा मुलगा बाबू कॉलेजांत जात होता. त्याच्याबरोबर तो संस्कृत भाषेंत बोले. पण बाबूला कांहीं त्याला संस्कृतांत उत्तर देतां येत नाहीं असं दिसून आलं, तेव्हां माझ्या पत्नीला आह् वीबद्दल फारच आदर वाटूं लागला.

त्याच्या अंगावर जे कपडे होते ते त्याला आवडत नव्हते. त्याच्या म्हणण्याप्रमाणें 'गांधीक्लॉथ'च्या कांहीं सैल तुमानी आणि सदरे मी करून आणले तेव्हां तो अगदीं गहिंवरून आला. परक्याचे उपकार घेणं त्याला दुःसह होत होतं. पण त्या कपड्याचं बोचकं मी लिलीच्या हातीं त्याच्याकडे दिलं म्हणूनच त्यानं तें घेतलं.

आतां विठू गडीसुद्धां त्याचं उष्टं ताट काढूं लागला होता. पहिल्यानं हें काम त्याच्या दृष्टीआड मलाच करावं लागे. पण आमच्या घरच्या साऱ्या माणसांच्या वृत्तींत आह् वीबद्दल जो हा बदल झाला त्याचं सारं श्रेय लिलीला होतं.

ती अगदीं त्याला चिकटून राहिली होती. आणि तोही आमच्याकडे राहिला होता, तो लिलीसाठींच. आम्हीं तिला 'ॲना मे वॉंग' म्हणत होतों तें त्याला आवडत नसे. तो तिला 'लू' म्हणे आणि आम्हींही तेव्हांपासून तिला 'लू' म्हणूं लागलों.

*　　*　　*　　*

एके दिवशीं आह वीला बरोबर घेऊन मी बॅकबेवर फिरायला गेलों होतों. तो सहसा घरांतून बाहेर निघत नसे. कुणी ओळखीचीं माणसं भेटतील या भीतीनंच तो बाहेर जायचं टाळतो असा माझा समज झाला होता.

आणि त्या दिवशीं झालंही तसंच. आम्हीं बॅकबेवर जायला आणि समोरूनच मलबार हिलवरचे फॅशनेबल चिनी समोरून यायला एकच गांठ पडली. त्यांना पहातांच त्याच्या कपाळाला आठ्या पडल्या. त्यांना चुकवण्यासाठीं तो माझा हात धरून ओढून मागं वळूं लागला. तितक्यांत त्यांनीं झपाझप पावलं उचलीत येऊन आम्हांला गांठलं.

आह वीला पाहतांच त्यांनीं अत्यंत आदरानं लवून प्रमाण केला. चिनी भाषेंत त्यांचं बोलणं सुरू झालं. आह वी शक्य तितकं बोलायचं टाळीत होता. बोलणं माझ्यासंबंधीं असावं असंच मला वाटलं. कारण बोलत असतांना वडील माणसांना बिलगणाऱ्या एखाद्या लहान मुलाप्रमाणें तो मला बिलगत होता. कदाचित ते आपल्याला ओढून नेतील अशी जणुं काय त्याला भीति वाटत होती.

ते सारे चिनी बहुधा तरुणच होते. तिघे पुरुष, दोन तरुणी आणि दोन मुली होत्या. सर्वांचा पोषाख अगदीं अस्सल इंग्रजी थाटाचा होता. त्या तरुणींनीं तर शॉर्ट्स् घातल्या होत्या.

त्यांतला सर्वांत वडील दिसणारा तरुण माझ्याकडे वळून अगदीं विशुद्ध इंग्रजींत मला धन्यवाद देऊं लागला. आह वीची मी माहिती विचारली तेव्हां तो म्हणाला, "चिनांत आह वीचा दर्जा फार मोठा आहे. तो मोठा तत्त्ववेत्ता आहे. सर्व धर्मांचा तौलनिक अभ्यास करून त्यानं चिनी भाषेंत मोठमोठे ग्रंथ लिहिले आहेत—"

ते त्याला आपल्याबरोबर घेऊन जाण्यासाठीं फार आग्रह करीत असावेत असं मला वाटलं. पण घाईघाईनं त्यांना प्रणाम करून माझा हात धरून तो पुढं सटकला. ते बरेच दूर जाईपर्यंत तो एक शब्दही बोलला नाहीं. ते बरेच दूर गेलेसे पाहून मग तो मला म्हणाला, "मला आवडत नाहीं तें हेंच. देशासाठीं आम्हीं झगडतों आहों, लाखों माणसांचं रक्त सांडतं आहे, त्या आमच्या लढाईसाठीं सैनिकांनीं पोषाख बदलले तर मला त्याचं कांहीं वाटत नाहीं. लढाईसाठीं तशा पोषाखाची जरूरी असेल. पण या घरगुती लोकांनीं आपले

पोशाख कां बदलावे ? आधींच चीन दरिद्री, त्यांत लढाईनं पिळून निघालेला, अन् या आमच्या मध्यम वर्गांत चांग काइ शेक आल्यापासून ही इंग्रजी फॅशन बोकाळली आहे. हें मला आवडत नाहीं—" आपल्या मोडक्या इंग्रजींत तो आपले विचार स्पष्टपणें बोलण्याचा प्रयत्न करीत होता पण तें त्याला साधत नव्हतं. देशप्रेमाची त्याची व्याख्या त्या चिनी लोकांपेक्षां कांहींतरी निराळी होती असा त्याच्या त्या मोडक्या तोडक्या भाषेंतून मी निष्कर्ष काढला.

घरीं आल्यावर मी सारी हकिकत माझ्या पत्नीला सांगितली तेव्हां आह् वीबद्दलचा तिचा आदर एकदम वाढला. बराच वेळ बाबूसुद्धां त्याच्याबरोबर बोलत बसला होता. संस्कृतांत बोलतांना त्याला इंग्रजीपेक्षां सोपं जाई आणि बाबू प्रश्न इंग्रजींत करी ते त्याला चांगले समजत.

मी बाजूला बसून ऐकत होतों. पर्ल बक, लिन यूतांग वगैरे लेखकांबद्दल बाबू त्याला विचारीत होता. पण या दोन्ही लेखकांबद्दल आह् वीला फारसा आदर नसावा असं मला दिसून आलं. लिन युतांगचं नांव घेतांच तर त्यानं कपाळाला आठ्या घातल्या. बाबूला तें आवडलं नाहीं. लिन युतांगबद्दल बाबूला फार आदर होता. आह् वी म्हणाला, "उत्तम इंग्रजी लिहितां आलं म्हणजे कांहीं माणूस मोठा होत नाहीं. माझ्या चीन देशाकडे लिन युतांग ज्या चष्म्यांतून पहातो तो चष्माच मला आवडत नाहीं. भौतिक गोष्टींत कितीही आधुनिकता आणली तरी चिनी माणसांनीं चिनीपणा सोडतां नये. लिन युतांगची दृष्टि चिनी राहिलेली नाहीं. अमेरिकन चष्म्यांतून तो चीनकडे पहात आहे. हेंच चाललंय तिकडे आज. आणि तेंच मला आवडत नाहीं. म्हणूनच मी हिंदुस्थानांत यायला निघालों. आपलीं माणसं मला इथंच मिळतील असं मला वाटलं होतं आणि तो माझा अंदाज खरा ठरला चेहरेपट्टींत अंतर असलं तरी भारतीयांचीं अंत:करणं चिनी माणसांपेक्षां भिन्न नाहींत. तुम्हीसुद्धां लिन युतांगसारखे परक्यांच्या संस्कृतीला दिपून गेलां आहांत—तरीही आपलेपणासाठीं झगडतां आहांत हें पाहून मला कौतुक वाटलं. कांहीं तरी घोंटाळा होतो आहे, कुठं तरी आमचं चुकतं आहे, तसंच तुमचंही चुकतं आहे. एकदां तुमच्या त्या महात्म्याला मी भेटायला जाणार आहें—"

ते ऐकून बाबूनं नाक मुरडलं. त्याला गांधींबद्दल फारसा आदर नव्हता.

तो तसं म्हणालामुद्दां. तेव्हां आह् वी म्हणाला, "लिन युतांग सारखंच तुमचं झालंय. आधुनिकतेचा मला तिटकारा नाहीं. पण आमची पुरातन परंपरा विसरणं मला अशक्य होऊन बसलंय्. कुठं तरी कांहीं तरी चुकल्यामुळं जगाच्या बाजारांत आम्हीं कवडीमोल ठरलों आहोंत. हें आमचं कुठं चुकतंय तेंच मी विचारणार आहें तुमच्या महात्म्याला. पण हें माझ्या भाषेचं कसं होणार याचीच मला शंका वाटते—"

याच विषयावर तो सारखा बोलत होता. मला राजकारणांत फारसं गम्य नव्हतं. मी एक व्यापारी माणूस होतों. व्यवहारापलिकडच्या इतर गोष्टींकडे मी फारसं लक्ष देत नसें. पण त्याच्या भाषणाचा बाबूवरही परिणाम झाला हें पाहून मला आश्चर्य वाटलं.

अजून कुणी कुणी लिलीला 'ॲना मे वॉंग' म्हणत असत. तसं कुणी म्हटलेलं ऐकलं कीं आह् वी एकदम चिडून उठे. त्या गोष्टीचं मला मोठं कौतुक वाटे. हा माणूस अगदींच सनातनी आहे का, असाही प्रश्न केव्हां केव्हां माझ्या मनांत उभा राही.

चीनांतली परिस्थिति मला माहित नव्हती. आणि तसं पाहिलं तर किती जणांना चीनांतलं राजकारण माहित आहे? वॉंग-चिन्-वेई म्हणजे एका काळचा केवढा मोठा जहाल पुढारी. पण तो जपानशीं सामील होऊन नाकिंग इथं अध्यक्ष झाला. आह् वीला वॉंग-चिन्-वेईचा मोठा अभिमान होता. पण तो जपान्यांना मिळाला याचं त्याला दुःख होई. हें नॉकिंग आणि चुंगकिंगचं राजकारण स्पष्ट करून सांगण्याचा तो केव्हां केव्हां प्रयत्न करी पण भाषेच्या वैगुण्यामुळं त्याला तें सांगतां येत नसे.

एवढं खरं, कीं त्याला चीनमध्यें होत असलेला परकी संस्कृतीचा प्रभाव आवडत नव्हता.

* * * *

लिलीला घेऊन आह् वी मधून मधून फिरायला जात असे त्यावेळीं ती कुणी चिनी मुलगीच आहे असं पहाणाऱ्याला वाटे. बॅकबेवर जाऊन तीं दोघंही बसलीं म्हणजे चिनी भाषेसारख्या शब्दांनीं लिली आह् वीशीं किडबिडत राहिल्या-मुळं ऐकणाऱ्यांचा हा संशय दृढ होई. माझ्या पत्नीला तें आवडत नसे. आह्

वी आल्यापासून लिलीनं सर्वांचाच लोभ तोडला होता, त्याचंही माझ्या पत्नीला वैषम्य वाटे. आह् वीबद्दल तिला आदर होता. माझा एकादा भाऊ असता तर त्याला तिनं जितक्या आदरानं वागवलं असतं तितक्याच आदरानं ती आज आह् वीशीं वागे. पण त्याच्यामुळं आपली मुलगी आपल्याला पारखी होते आहे, हें पाहून ती अस्वस्थ होई.

त्या दिवशीं लिलीला ताप आला. एकदम टेंपरेचर एकशें चार पर्यंत गेलं. पण ती कांहीं आपल्या आईला हात लावूं देईना. आह् वी तिला सारखा घेऊन बसला होता. त्या दिवशीं त्यानं आपला नित्याचा पूजा अर्चेचा क्रम देखील टाळला—घडसा जेवला देखील नाहीं. त्याचे डोळे सारखे भरून येत होते.

डॉक्टर येऊन लिलीला पाहून गेले तेव्हां तो म्हणाला, "मी एक दुर्दैवी माणूस आहें. जिथं माझा जीव ओढतो तिथं हें असं होतं. माझ्या मुलीसाठीं मी कासावीस होत असें, ती तशी गेली. माझ्या चीन देशासाठीं माझ्या अंतः-करणांत कशी खळबळ उडते तें कुणाला सांगतां यायचं नाहीं, त्या माझ्या देशाची तशी दुर्दशा चालली आहे. आतां इथं या भरतभूमींत आलों. इथंही तेंच! आमच्यावरचं संकट इथंही येतंय. मला वाटतं, प्रेमाचं स्थान सोडून मला दूर गेलं पाहिजे—" असं म्हणून तो हुंदके देऊन रडूं लागला.

लिलीचा ताप पहांटे उतरला. तोंपर्यंत तो सारखा जागत बसला होता. तिच्या आईलासुद्धां झोंप लागली पण त्याच्या डोळ्याचं पातं लवलं नाहीं. कुणाच्याही प्रेमापेक्षां त्याचं प्रेम आत्यंतिक होतं. आत्यंतिकतेशिवाय कुठं प्रेमच करायचं नाहीं अशीच का या थोर पुरुषाची वृत्ति होती?

दुसऱ्या दिवशीं लिलीला ताप आला नाहीं. एकदोन दिवसांत ती चांगली खडखडीत बरी झाली. पूर्वीच्या सारखी ती हसूं खेळूं लागली तेव्हां कुठं आह् वीला सुखानं जेवण जाऊं लागलं.

* * * *

आजपर्यंत त्यानं माझ्याकडे कधींच कांहीं मागितलं नव्हतं. त्याची गरज ओळखून मी जरूर त्या वस्तु त्याला आणून देत असें. पैशाला तो कधींही शिवला नाहीं, म्हणूनच त्या दिवशीं त्यानं माझ्याकडे पंचवीस रुपये मागितले याचं मला आश्चर्य वाटलं.

त्यानं कांहीं तरी मागावं असं मला सदोदित वाटे. पण आतां ही मागणी करतांच मात्र मला एक प्रकारचा धक्का बसला.

पंचवीस रुपयांच्या नोटा मी त्याच्या हातावर ठेवल्या त्यावेळीं त्याच्या डोळ्यांतून खळखळ आसवं वाहूं लागलीं. तोंडाशीं येणारा हुंदका गिळण्यासाठीं त्यानं आंवढा गिळला पण तोंडावाटे एक शब्दही काढला नाहीं.

त्या दिवशीं लिलीला बरोबर घेऊन तो बॅकबेवर गेला होता. मीही सहजगत्या बॅकबेकडे वळलों, त्यावेळीं तो मला दिसला म्हणून पुढं गेलों. लिली सारखी त्याच्याबरोबर खिदळत होती. मला पहातांच तो म्हणाला, "हिला घेऊन जा तुम्ही घरीं. मी मलबारहिलवर जाऊन येतों. अगदीं उंच उंच कुठं तरी जावं असं मला वाटतंय. मुंबईत तेवढीच 'उंची' आहे. हिमालयावरसुद्धां गेलों असतों पण हिमालयसुद्धां मला ठेंगणा वाटतो—" तो एक क्षणभर थांबला आणि एक मोठा सुस्कारा सोडून म्हणाला, "मला काय झालंय कोण जाणे. आतांच हें वर्तमानपत्रांत वाचलं, वैझागपट्टणवर बॉंब पडले. हें लक्षण कांहीं ठीक नाहीं. माझ्या देशभाईंना मला भेटलं पाहिजे."

"त्या लोकांना ?" मी 'त्या' या शब्दावर जोर देऊन खोचून प्रश्न केला.

"ते माझे भाईबंद आहेत !" तो म्हणाला, "चुकलेलीं वासरं आहेत तीं. उद्यां चीन निर्वेध होईल तेव्हां त्याचे डोळे उघडतील. तुमचे भाईबंद तरी काय आहेत ? आणि आतां तुमच्यावर हें संकट येतं आहे—हिला घेऊन जा तुम्हीं !—"

त्याचं भाषण जरी लिलीला कळलं नाहीं तरी तो जातो आहे असं पाहून ती रडूं लागली.

समोरून फुगेवाला जात होता त्याला त्यानं खूण करून बोलावलं—

पण तितक्यांत तो थांबला आणि मला म्हणाला. "हे फुगे जपानचे नाहींत ना ?"

"नाहींत." मी म्हटलं. "नागपुरचे असतील किंवा इथले कांदिवलीचे असतील."

त्यानं चार पांच फुगे विकत घेतले आणि ते लिलीच्या हातीं देऊन त्यानं तिचा कडकडून मुका घेतला. त्याचे डोळे अगदीं भरून आले होते. त्याच्या

त्या विचित्र वर्तनाचा अर्थ मला कळेना. काय होतं त्याच्या मनांत ?

लिली फुग्याशीं खेळते आहे अशी संधि साधून एक शब्दसुद्धां न बोलतां तो तिथून निसटण्याचा प्रयत्न करीत होता. पण मी त्याला थांबवलं आणि विचारलं, "तुम्हांला त्या लोकांचा पत्ता माहित आहे का ?"

"विचारीन कुणाला तरी." तो म्हणाला आणि जाऊं लागला—

तितक्यांत लिलीच्या हातचा एक फुगा फुटला तसा तो दचकून थांबला.

शुद्ध संस्कृतांत तो उद्गारला, "असं आहे हें जीवित. खेळत असतां तो खेळांतला फुगा सहज फुटून जातो—" अगदीं केंविलवाण्या मुद्रेनें माझ्याकडे पाहून तो हंसला.

पहिल्या दिवशीं ज्यावेळीं तो मला भेटला होता त्यावेळीं हीच मुद्रा त्याच्या चेहऱ्यावर होती. मधला काळ–सुखासमाधानाचा काळ—पुसून गेला का, असं क्षणभर मला वाटलं.

* * * *

रात्रीं आम्हीं किती तरी वेळ वाट पाहिली. पण आह् वी आला नाहीं. पोलिस चौकीवर जाऊन मी वर्दी दिली. जिथं जिथं म्हणून चिनी माणसं रहात होतीं तिथं तिथं जाऊन पोलिसच्या मदतीनं तपास केला. पण तो कोणत्याच चिनी माणसाकडे गेला नव्हता असं कळून आलं.

—कुठं गेला आह् वी ? कां गेला ?

# त्याच्या बायकोचें लग्न

चंदूचा स्वभाव पहिल्यापासूनच मोठा आनंदी. परिस्थिति कशीही असली तरी तिचा परिणाम त्याच्या मनावर झाल्याचें एव्हढेंसुद्धां दिसून येत नसे.

पण पहिल्यापासूनच त्याचीं मतें विक्षिप्त होतीं. कोणताही विषय चर्चेला घ्या, कीं तिथें चंदूचा विरोध ठेवलेलाच. ती त्याची संवयच होती

केव्हां केव्हां तर तो बुद्धिपुरस्सर विरोध करीत असे. त्याचीं मतें आम्हांला माहीत असल्यामुळें आमच्यापैकीं कुणी जर त्याला विचारलें, तर तो म्हणे, " हा अभ्यास आहे माझा! आपल्या मताच्या विरुद्ध देखील आपल्याला बुद्धिवाद करतां येतो कीं नाहीं याचा अभ्यास मी करतों आहे "

तसा तो अगदीं प्रामाणिक होता. अशी बुद्धिपुरस्सर केलेली स्वमतविरोधी बुद्धिवादी चर्चा करण्याचा प्रसंग क्वचितच येत असे. पण इतर बाबतींत त्याचा जो विरोध असे तो अगदीं अंत:करणपूर्वक

कोणत्याही विषयाकडे पहाण्याची त्याची दृष्टि नेहमीं सरळ असे. त्या सरळ रेषेनें जायचें, आडवाटा फोडायच्या नाहींत, सरळ रेषेनें गेलें म्हणजे युक्तिवाद सुलभ होतो असेंच त्याचे मत होतें.

लग्न होऊन तो आला त्यावेळीं कॉलेजांतल्या आम्हा साऱ्या महाभ्यायांना मोठें आश्चर्य वाटलें. लग्नाबद्दलचीं त्याचीं मतें निश्चित होतीं. दोन माणसांचे स्वभाव-धर्म एकमेकांना पूर्णपणें कळल्याशिवाय जर कुणाचें लग्न झालें, तर तें हटकून दु:खपर्यवसायी झालें पाहिजे असें त्याचें निश्चित मत होतें.

मग हें लग्न झालें कसें? उन्हाळ्याच्या सुट्टींत तो घरीं गेला होता—आणि आला तो परत लग्न करून आला.

दोन माणसांचे स्वभावधर्म एकमेकांना पूर्णपणें कळायला हा अल्पावधि मुळींच पुरेसा नव्हता.

मी त्याला एकांतांत विचारलें तेव्हां तो म्हणाला, "नाइलाजानं हा फासा मला टाकावा लागला आहे. माणसाच्या कांहीं भावना असतात. कितीही ध्येय-वादी माणूस असला तरी अशा एकाद्या भावनेला तो कळूनसवरून बळी पडतो, तसंच माझं झालं आहे. आई आसन्नमरण स्थितींत होती. तिनं हट्ट घेतला, कीं माझ्या नजरेसमोर चंदूचें लग्न झालं पाहिजे. मुलगी तिनें आधींच हेरून ठेवली होती. मुलीला नांव ठेवण्याजागं असं कांहींच व्यंग नाहीं. ती एफ्. वाय. झाली आहे—पुढं कॉलेजांत जाणार म्हणते—दिसायला चांगलीच देखणी आहे. प्रकृतीनं निकोप आहे. वरात निघून घरांत आली तेव्हांपासून माझ्या आईच्या सेवेला लागली आहे. पण—" डाव्या आंगठ्याच्या नखावर हातांतील पेन्सील आपटीत तो नुसतें 'पण,' करीत माझ्याकडे पहात राहिला.

मला कळून चुकलें, प्रकरण कांहीं ठीक नाहीं.

"असं झालंय तें!" चंदू म्हणाला, "सारी मंडळी खूष आहेत. आम्ही उभयतांही एकमेकांवर खूष आहोंत असाच सर्वांचा समज आहे. पण आतां—कसं सांगूं तुला!"

तो स्वस्थ राहिला—मीही स्वस्थ राहिलों.

एक क्षणभर तसाच गेल्यावर मी म्हटलें, "म्हणजे तुम्ही दोघंही लोकांना फसवताहांत?"

"छे छे मुळींच नाहीं," चंदू विचारमग्न होऊन म्हणाला, "पण तुला कसं सांगावं याचा विचार करतोंय—तसं पाह्यलं तर एका घरांत राहणारीं दोन माणसं या नात्यानं आमचा कांहींच कुठं विरोध नाहीं—म्हणूनच लोकांना वाटतं, कीं आम्ही एकमेकांवर खूप आहोंत—पण तें असं झालं—पहिल्याच दिवशीं आमची भेट झाली—अन् पहिल्याच दिवशीं आम्ही एकमेकांचे दोस्त बनलों—पतिपत्नी नव्हे. पहिल्याच दिवशीं आम्ही एकमेकांपासून दूर झालों. धार्मिक विधींचं चोज राहिलं नाहीं. ती मुद्दां चांगली हुषार आहे—माझ्याइतकीच हुषार

आहे. माझ्यासारखी कवि किंवा लेखक नाहीं पण सार्वजनिक कार्याची तिला मोठी हौस आहे. इथंच असते ती मुंबईला. बहुतेक बायकांच्या चळवळींत वगैरे प्रामुख्यानं भाग घेते. कदाचित् तूं तिला पाहिली देखील असशील !--''
पुनः तो क्षणभर स्वस्थ राहिला.

मला वाटलें, कोडें मोठें बिकट आहे. व्यंग कुठेंच नाहीं, विरोध कुठेंच नाहीं, मग गाडें अडलें आहे कुठें ?

तो बोलूं लागला. बोलतांना त्याची नजर भलतीकडेच होती. चुकूनसुद्धां तो माझ्याकडे पहात नव्हता. असा बेभान झालेला मी त्याला केव्हांच पाहिला नव्हता.

तो बोलूं लागला--

''मला तिचा अभिमान वाटला तो एकाच गोष्टीबद्दल, कीं पहिल्याच दिवशीं--पहिल्याच घडीला--तिनं सांगून टाकलं ! तिनं सांगून टाकलं, कीं तिच्या मताप्रमाणें तिचं लग्न ठरलं नव्हतं. तिच्या वडील माणसांना माहीत नव्हतं. सांगायची संधीच मिळाली नाहीं. ती म्हणाली, 'असं तुमच्यासारखंच झालंय. एवढी घाई केली सर्वांनीं, कीं नाही होय म्हणायला मला अवकाशच राहिला नाहीं. दुसऱ्या कुणालाही सांगितलं तर पटायचं नाहीं पण तुम्ही लेखक आहांत कवि आहांत--माझ्या मनःस्थितीची तुम्हांला कल्पना करतां येईल. आम्ही बरोबरचे विद्यार्थी, लहानपणापासूनचा परिचय, बाबांना किंवा आईला कांहींच कल्पना नव्हती. ओळखीची चार मित्रमंडळी येत होती तसाच तो, असं त्यांना वाटत होतं. अन् तुमची ही आई अशी अगदींच थकलेली म्हणून मुहूर्त ठरवायची घिसाडघाई झाली. मी सांगितलं असतं तर कुणी ऐकलं सुद्धां नसतं. काय झालं तें मला कांहीं सांगतां यायचं नाहीं; पण बोलावं असं मनांत आणलं, कीं जीभ लुळी पडे. अगदीं लग्नघटकेपर्यंत वाटत होतें, कीं सांगावं म्हणून ! शेवटीं माळ पडली. म्हटलं होऊन जाऊं द्या आतां काय व्हायचं तें ! या बेफिकीर वृत्तीनं मी तुमच्या घरीं आलें. मी व्यभिचारी व्हावं असं तुमचं मत आहे का ? मला आनंद झाला. आम्हीं अगदीं समोरासमोर बसलों होतों, तरी सुद्धां कोणतीच तारुण्यसुलभ भावना जागृत झाली नाहीं--असं सांगितलं तर तुला खरं वाटणार नाहीं. माझं रहस्य मी तुला अजून सांगितलं नाहीं--पण आतां सांगतों. माझंही

असंच कांहीं तरी आहे !–सहानुभूति जागी झाली आणि मी म्हटलं, 'ठीक आहे, आपण एकाच होडींत आहोंत. Let us be friends. आपण एकमेकांकडे दुर्लक्ष करूं. दुर्लक्ष करणं म्हणजेच मदत करणं आहे. प्रतारणा माझ्याकडून व्हायची नाहीं. तुला वाटेल तें तूं कर. इथं राह्यचं असलं तर इथं रहा. माहेरीं जायचं असलं तर माहेरीं जा. पुढला विचार मी सध्यां कांहींच करीत नाहीं.' तिला आनंद झाला. तो प्रत्यक्ष तिच्या चेहऱ्यावर दिसत होता. धीर करून तिनं ज्यावेळीं मला सांगितलं, त्यावेळीं माझ्याकडून असं उत्तर मिळेल अशी तिची अपेक्षा नव्हती—"

मी थक्क झालों. हा असा भावनावश माणूस कल्पनेच्या तरंगावर अखंड झुलत राहाणारा—कसें होणार याचें पुढें ?

( २ )

चंदू बी. ए. झाला—एम. ए. झाला. त्याची बायको इंटर झाल्यावर कॉलेज सोडून घरीं माहेरीं राहिली.

चंदूची आई जोंपर्यंत जिवंत होती तोंपर्यंत ती सासरीं जात असे. चंदूला ज्यावेळीं घरीं जायचे असे त्यावेळीं तो तिला कळवी आणि ती माहेरीं निघून जाई.

मुंबईला क्वचित् तिची त्याची गांठ पडे, पण ती अगदीं परक्यासारखीच. सरोज ही चंदूची बायको आहे, हें फारच थोड्यांना माहीत होतें.

मी तिला पाहिलें तेव्हां मला आश्चर्य वाटलें. चांगली देखणी, तेजस्वी, चलाख दिसणारी बायको मिळाली असतां चंदूनें तिला सूट दिली कशी ?

माझें लग्न झालें होतें. तें असेंच आपलें जुन्या पद्धतीप्रमाणें ! माझ्या संसाराच्या कल्पना अगदीं व्यावहारिक होत्या. मला वाटत होतें, अशा बायकोशीं आपली गांठ पडली असती तर एका शब्दासरशीं आपण कांहीं तिला हातची जाऊं दिली नसती.

मी चंदूला तसें सांगितलें, तेव्हां तो म्हणाला, "तुझ्या माझ्यांतला फरक तो हाच. तूं मोठा हुषार आहेस, व्यवहारी आहेस, म्हणूनच सामान्य माणूस आहेस. मी असामान्य आहें. तीही अशीच असामान्य आहे. दोन असामान्य माणसांचं कधींच जुळायचं नाहीं. मला प्रश्न पडलाय तो हाच, कीं हें कोडं उलगडायचं कसं ? मला मोकळीक पाहिजे तशीच तिलाही मोकळीक पाहिजे. पण ही

मोकळीक मिळायची कशी ? आमचं लग्न झालंय वैदिक विवाहपद्धतीनं, तिथंच सारं अडून राह्यलंय. या लग्नांत सुटका नाहीं. मला सुटका आहे—पण तिला सुटका नाहीं. आज मी जाऊन सरळ दुसरं लग्न करूं शकतों. पण तिचं लग्न झाल्याशिवाय मी जर या सवलतीचा फायदा घेतला तर माझं मन मला जन्मभर खात राहील. तो गुन्हा माझ्या हातून होणार नाहीं. तिला सुटका कशी मिळावी ? –" डाव्या हाताच्या नखावर पेन्सील वाजवीत तो एकच वाक्य पुनः पुनः उच्चारीत होता. 'तिला सुटका कशी मिळावी ?'

मी तरी काय सांगणार होतों ? ही अभंग गांठ बसली होती. अभंग तरी कशी म्हणूं ? त्याला मोकळीक होती. मला वाटलें, असलेल्या मोकळिकीचा फायदा त्यानें कां घेऊं नये ? त्याच्या प्रेमसंबंधाची हकिकत आतां मला कळली होती—नव्हे, त्या दोघांची गांठ पडण्यासाठीं मीच मध्यस्थ झालों होतों. माझ्याच घरीं तीं भेटत असत. त्यांना भेटायला मोकळीक मिळावी म्हणून मी माझ्या बायकोला घेऊन ठराविक वेळपर्यंत फिरायला जात असें—माझ्या बायकोला मी कांहींच पत्ता लागूं दिला नव्हता, कारण ती अगदीं जुन्या काळची होती. तिला हें मुळींच पसंत पडलें नसतें.

सार्वजनिक कार्यांत सरोज जिकडे तिकडे चमकत होती. सर्वांच्या तोंडीं तिचें नांव झालें होतें. ती चंदूची बायको आहे हे ज्यांना माहीत होतें ते चंदूला दोष देत. इतकी बुद्धिमान्, इतकी कर्तबगार, इतकी देखणी बायको चंदूनें कां टाकावी ? कित्येक निंदक त्याच्या पौरुषाबद्दलसुद्धां शंका घेऊं लागले.

असल्या निंदा स्तुतीचा परिणाम होण्याइतकें चंदूचें मन पांगळें नव्हतें. तो कुणाचीच पर्वा करीत नसे. प्रत्यक्ष कुणी तसा आरोप केला असता तर त्याच्या समाधानासाठीं त्यानें 'होय' म्हटलें असतें पण वादविवाद केला नसता.

कवि आणि लेखक या नात्यानें चंदूची जितकी सर्वत्र प्रख्याती होत होती, तितकीच बायकोला टाकल्याबद्दल त्याची निंदाही होत होती.

चंदू रोज उपाय शोधीत होता. लग्न रजिस्टर झालेलें असतें तर उभयतांच्या संमतीनें तें सहज मोडतां आलें असतें. पण लग्न वैदिक पद्धतीनें झालेलें असल्यामुळें चोहों बाजूंनीं कोंडमारा झाला होता.

दोघांनाही मोकळीक पाहिजे होती आणि मोकळीक देण्याची दोघांचीही तयारी होती.

मी एकदां सरोजची गांठ घेतली. चंदूपेक्षांदेखील ती जास्त उतावीळ झाली होती. चंदूच्याबद्दलचा तिचा आदर पाहून मला कौतुक वाटलें. लोक भलभलत्या कंड्या पिकवीत होते, भलभलतीं नांवें ठेवीत होते. सामान्य लोक-समूहाचा कल पुरुषाचा दोष देण्यांत होत असतो त्याचेंच तिला वाईट वाटत होतें. ती म्हणाली, "दोष त्यांचा नाहीं कीं माझाही नाहीं. परस्परांच्या संमतीनें आम्हीं विभक्त झालों आहोंत. मग लोकांना आमची उठाठेव कशाला ? बरं, आमची उठाठेव करूं नका असं सांगितलं म्हणून लोक तरी थोडेच स्वस्थ रहाणार आहेत ? मी त्यांचाच कित्ता गिरवतें आहें—कुणी कांहीं म्हटलं तरी त्याची पर्वा करायची नाहीं—" थोडा वेळ थांबून ती म्हणाली, "लग्न करायचं असलं तर त्यांना कांहीं आडकाठी नाहीं. माझा विचार बाजूला ठेवून ते कां लग्न करीत नाहींत ? माझं काय व्हायचं असेल तें होईल. त्यांनीं लग्न केलं तर माझी संमति आहे.—जगही कांहीं म्हणणार नाहीं. लेखक या नात्यानें प्रख्यात असल्यामुळं कदाचित चार वर्तमानपत्रं चार दिवस कांहीं तरी लिहितील, त्याचं मला तरी कांहीं वाटणार नाहीं. मग जगाची पर्वा त्यांनीं कां करावी !"

"तो फार विक्षिप्त माणूस आहे !" मी म्हटलें, "जोंपर्यंत तुम्हाला तुमच्या मनाप्रमाणें लग्न करतां येत नाहीं तोंपर्यंत आपण लग्न करणं म्हणजे गुन्हा होईल, असं त्याला वाटतं. तसं पाहिलं तर त्याचंच म्हणणं खरं आहे— कायद्याच्या दृष्टीनं नव्हे—व्यवहाराच्या दृष्टीनं नव्हे—नुसत्या माणुसकीच्या दृष्टीनं ! पण माणुसकीची पर्वा कोण करतो आहे ? तुमचं म्हणणं मी त्याला सांगेन."

मी चंदूला तसें सांगितलें तेव्हां तो म्हणाला, "तूं मूर्ख आहेस. मी जगाची पर्वा करीत नाहीं—पर्वा करतों ती माझ्या मनोदेवतेची ! या बंधनांत सरोजला अडकवायला माझा मूर्खपणा कारण झाला आहे. भावनेला बळी पडून मी लग्नाला उभा राहिलों नसतों तर ती सुखी झाली असती—निदान दुःखी तरी झाली नसती. हा दोष माझा आहे अन् त्याचे परिणाम मला भोगले पाहिजेत. माझ्या मूर्खपणाची मला योग्य शिक्षा मिळाली पाहिजे !"

त्यावर मी तरी काय बोलणार होतों? कुठेंच कांहीं कुलकिनारा दिसत नव्हता.

मी माझ्या वकील मित्रांना विचारून पाहिलें. पण या लग्नाच्या कायद्याच्या बाबतींत वकिलांना एकंदरींत फारच थोडें कळतें असें मला दिसून आलें. जिथें अशा प्रकारचे खटलेच उत्पन्न झाले नाहींत तिथें त्या कायद्याचा अभ्यास तरी कोण कशाला करतो?

दिवसावर दिवस–महिन्यावर महिने जात होते, पण उपाय सांपडत नव्हता. दोघेंही अत्यंत अस्वस्थ झालीं होतीं आणि त्या त्यांच्या अस्वस्थपणाचा परिणाम निष्कारण माझ्याही मनावर होत होता.

( ३ )

एके दिवशीं चंदू माझ्याकडे आला आणि एक कसलें तरी खत माझ्या हातीं देऊन म्हणाला, "पहा!"

"मला यांत कांहीं कळत नाहीं." मी सांगितलें, "हे असले दस्तैवज पाह्यला मी काय वकील आहे?"

"पहा." चंदू म्हणाला, "पहा तर खरं काय आहे तें."

तें एक खरेदीखत होतें. बडोदें संस्थानांतल्या एका खेड्यांतील एक बरीचशी मोठी जमीन चंदूनें खरेदी केली होती.

मी चकित झालों. मला वाटलें. मुंबई सोडून चंदू आतां बडोद्याला जाऊन राहाणार! चंदूचा सहवास असा दुरावणार हें पाहून मी कासावीस झालों. मी म्हटलें, "म्हणजे तूं बडोद्याला राह्यला जाणार आहेस?"

"गद्धा आहेस!" चंदू खुललेल्या आवाजानें म्हणाला," मी आतां बडोदें संस्थानचा प्रजाजन झालों आहे. बडोदे संस्थानच्या नागरिकांना जे हक्क आहेत ते हक्क कांहीं दिवसांनीं मला मिळणार आहेत."

माझ्या डोक्यांत प्रकाश पडला नाहीं. बडोदें संस्थानच्या नागरिकांचे हक्क मिळवून चंदू असें कोणतें मोठें शतकृत्य साधणार होता? संस्थान आणि संस्थानांतील प्रजा यांच्याबद्दल आम्हां सर्वांनाच मोठा तिटकारा होता. संस्थानचे प्रजाजन कसे आत्मपरायण असतात, सार्वत्रिक भावनेचा त्यांच्या ठिकाणीं कसा अभाव असतो, या गुलामी वृत्तीमुळें आणि संस्थानिक म्हणजेच अन्नदाता, मायबाप

असें समजून सुखांत राहाण्याच्या अल्पसंतुष्टतेमुळें संस्थानी प्रजा कशी मृतप्राय झालेली आहे, याची चर्चा करतांना सर्वांपेक्षां चंदूलाच मोठा आवेश येत असे.

आणि आतां त्यानें हें काय केलें ?

मनाविरुद्ध कोणतीही गोष्ट न करण्याचा चंदूचा आजवरचा बाणा माहीत असल्यामुळें मला त्याच्या त्या उल्हासाचें जितकें आश्चर्य वाटलें, तितकाच त्याचा राग आला.

मी म्हटलें, "तूं मोठा प्रामाणिक माणूस आहेस चंदू, असा मला अभिमान होता. कायद्यानं आणि रूढीनं शक्य असतां सुद्धां, केवळ प्रामाणिकपणाच्या पायीं तूं लग्न केलं नाहींस म्हणून मी तुझ्याबद्दल अभिमान बाळगीत होतों. पण ज्या संस्थानच्या प्रजेची तूं कींव करीत आलास त्याच कींवलवाण्या परिस्थितींत जायची तुझी ही तयारी पाहून—"

"हं! थांब, थांब," चंदू मोठमोठ्यानें हंसत म्हणाला, "बडोद्याच्या प्रजाजनांना कोणकोणते हक्क आहेत हें तुला माहीत आहे का?"

"असतील, फार छान छान हक्क असतील—पण इतर संस्थानांपेक्षां बडोदें संस्थान पुढारलेलं आहे म्हणून तत्वाशीं बेइमान होऊन तूं संस्थानचा प्रजानन का होणार आहेस?"

"आतां पुनः तुला मी मूर्ख म्हटलं," चंदू आणखी मोठमोठ्यानें हंसत म्हणाला, "तर तूं आणखी चिडशील. तुझी कसोटीच पाहायची आहे मला. बडोद्याच्या प्रजाजनांना काय काय हक्क आहेत याचा एकदां चांगला तपास कर—चांगला आढावा घे. बडोद्याचा प्रजाजन होण्यांत केव्हढा फायदा आहे हें जेव्हां तुला कळेल तेव्हां तुला सुद्धां वाटूं लागेल, कीं बडोद्याचाच प्रजाजन व्हावं म्हणून!"

माझ्या उत्तराची अपेक्षा न करतां माझ्या पाठीवर जोरानें एक थाप मारून तो हंसत हंसत निघून गेला.

पुनः त्या विषयाचा चंदूशी उल्लेख सुद्धां करायचा नाहीं असें मी ठरवलें, इतका मला संस्थानी प्रजाजन होण्याबद्दल तिटकारा होता.

हल्लीं चंदू मोठा खुषींत असे. त्याचें एक नवीन नाटक प्रसिद्ध झालें होतें. आम्ही सर्व मित्रमंडळींनींच जमून त्या नाटकाचा प्रयोग केला होता. आपल्या

वाङ्मयांत या नाटकामुळें भयंकर क्रांति होणार, हा जसा आम्हाला अभिमान होता तसाच तज्ज्ञ लोकांचाही अभिप्राय पडला.

चंदू हल्लीं खुषीत दिसत असे तो या नाटकाच्या यशामुळें, असा माझा समज झाला.

आणखी कांहीं महिने निघून गेले. चंदूनें आणखी दोन पुस्तकें लिहिलीं. त्याचा एक काव्यसंग्रहही प्रसिद्ध झाला. त्याच्या लेखनांत एक विलक्षण ओज आलेलें दिसत होतें. त्याच्या प्रभावी लेखणीला जसा कांहीं चेव आला होता.

विचारावें असें मला वाटे, पण अभिमानामुळें मी बरेच दिवस वाट पाहिली.

जिज्ञासा अभिमानापेक्षां प्रबल झाली आणि मी त्याला विचारलें, "आतां बडोद्याला राह्यला केव्हां जाणार आहेस ?"

तो मोठमोठ्यानें ही ही करून हसूं लागला. त्या त्याच्या हंसण्यांत इतका कांहीं खवचटपणा होता, कीं त्यावेळीं खाडकन् त्याच्या एक थोबाडींत लगावावी असें मला वाटल्यावांचून राहिलें नाहीं. तो म्हणाला, "थांब बेटा, थांब. आणखी थोडेच दिवस वाट पहा. मी बडोद्याचा शंभर टक्के प्रजाजन झालों, कीं तूं आनंदानं बेहोष होशील !"

तसाच हंसत तो पुनः निघून गेला.

चंदू मला नुसता खेळवतो आहे, असें मला वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

मधल्या काळांत सरोज मुंबईत कुठेंच दिसली नाहीं. चौकशी केली त्यावेळीं मला असें कळलें, कीं ती बडोद्याला राह्यला गेली आहे.

माझ्या डोक्यांत प्रकाश पडला. मी आनंदानें बेहोष होणार काय ? हें असें करायचें होतें, तर मग इतकीं वर्षें कां उगीच जिवाचे हाल करून घेतले या दोघांनीं ?

माझी खात्री झाली, बडोदें संस्थानांत जाऊन स्थायिक व्हायचें असें या दोघांनीं ठरवलेलें असलें पाहिजे. तत्वाचा बडिवार नाहींसा झाला ! सारें आयुष्य झगडत राहण्याचा संकल्प फोल ठरला !

मला वाटलें, मनुष्यस्वभाव आहे—तारुण्याचा प्रभाव मोठा दुर्धर आहे—चांगली सुंदर बायको, आजवर तिची निष्कारण उपेक्षा केली, याचा चंदूला

पश्चात्ताप झाला असावा. तिचाही जो कोणी होता तोही कदाचित् लग्नाला बळी पडला असावा.

तो कोण होता तें मला माहीत होतें. मी चौकशी केली तेव्हां कळून आलें, कीं तो मुंबईतच होता आणि लवकरच त्याचें लग्न होणार होतें.

माझा अंदाज बरोबर ठरला याबद्दल मी स्वतःवर मोठा खूष झालों.

तत्वासाठीं झगडणाऱ्या या लोकांपेक्षां जुन्या काळच्या परंपरेला अनुसरणारे, वडिलांनीं मळवलेल्या वाटेनें धिमे पाऊल टाकीत जाणारे, आमच्यासारखे लोकच एकंदरींत प्रामाणिक खरे, असें मला वाटूं लागलें. नवे विचार, नव्या कल्पना, नव्या भावना आणि त्यांच्या अनुषंगानें तत्वनिष्ठेचा डोलारा उभारून गगनाला गवसणी घालूं पहाणारे चंदूसारखे तरुण शेवटीं हे असे कोसळून पडतात आणि आपल्याबरोबरच आपल्या नव्या कल्पनांचेंदेखील डोकें फोडून टाकतात, असें मला वाटलें.

पुन: मला आश्चर्याचा धक्का बसला. सरोजनें बडोदें सरकारांत चंदूपासून सोडलग्न ( Divorce ) मागण्याचा दावा घातल्याची बातमी आली.

अरेच्या ! असा डाव होता काय या लबाडांचा ?

* * * *

चंदू हजर राहिला नाहीं आणि सरोजला सोडचिठ्ठी मिळाली.

"पाहिलंस ?" चंदू म्हणाला, "संस्थानचा प्रजाजन होण्यापासून केव्हडा फायदा आहे ? केव्हढा पश्चात्ताप होतो आहे मला या ब्रिटिश हद्दींत जन्म घेतल्याबद्दल !"

बाजू माझ्या अंगावर आली होती.

मी विचारलें, "आतां तूं काय करणार ? केव्हां लग्न करणार ?"

"थांब, बेटा, थांब !" चंदू म्हणाला, "तूं विसरतोस, मी नाटककार आहें, पुढल्या प्रवेशांत काय आहे हें सांगितलं म्हणजे त्याची मजा जाते. पुढल्या प्रवेशाचा पडदा केव्हां उघडतो तें नुसतं पहात राहा."

चौकशी करतां मला असें कळलें, कीं बडोदें संस्थानांत जाऊन हा खटला करण्याचा वगैरे सगळा खर्च चंदूनेंच केला होता. या कामीं सरोजला मदत करण्याची तिच्या बापाची तयारी नव्हती आणि ज्याच्यासाठीं तिनें हा स्वार्थत्याग

केला होता त्याची, हा एवढा खर्च करण्याची ऐपत नव्हती.

चंदूबद्दल मला मोठा अभिमान वाटला. लेखनाची कमाई त्याला जेमतेम अन्नवस्त्र देण्याला पुरेशी होती. गांवीं असलेली वतनवाडी विकून त्यानें बडोद्यांतली ही जमीन खरेदी केली होती—स्वतःच्या खर्चाची काटकसर करून आणि कर्ज काढून खटल्याचा खर्च त्यानें भागवला होता !

* * * *

"चल ऊठ !" चंदू एके दिवशीं संध्याकाळीं अगदीं अचानक माझ्या घरीं येऊन मला म्हणाला, "कुठं म्हणून विचारूं नकोस. मी आतां अगदीं सनातनी झालों आहें. कुठं म्हणून विचारलंस, तर कार्य बिघडेल !" नित्याच्या पद्धती-प्रमाणें तो खंवचटपणें मोठमोठ्यानें हंसला.

आम्ही जायला निघालों त्यावेळीं नरोत्तम भाऊच्या दुकानीं जाऊन त्यानें कांहीं जिन्नस खरेदी केले.

कुठें चालला आहे हा ? मला प्रश्न पडला. या असल्या किंमतवान् वस्तु कुणासाठीं नेतो आहे ?

आम्ही फॉर्बस गुजराती हॉलमध्यें आलों. तिथें माणसांची बरीच गर्दी झालेली होती. कांहींतरी मोठा समारंभ होता. वरच्या मजल्यावर जाऊन पाहिलें तों तिथें मला सरोज दिसली. तिचा 'तो' देखील तिच्या शेजारींच उभा होता.

रजिस्ट्रार आला होता. लग्न नोंदवलें गेलें.

साक्षीदार म्हणून मी आणि चंदूनें सह्या केल्या.

दोघांनीं एकमेकांना हार घातले आणि दोघांनींही चंदूच्या पायावर डोकें ठेवलें—नमस्कार केला. तोंड भरून चंदूनें आशीर्वाद दिला.

त्याच्या डोळ्यांतून खळखळ आसवें वहात होतीं. सरोजही अगदीं गहिवरून आली होती. तिनें त्याचा हात धरला.

तो पहिलाच स्पर्श. परकेपणाची भावना निश्चित झाल्यानंतर तिनें त्याचा हात धरला आणि म्हटलें, "या ऋणांतून कशी उतराई होऊं ?"

तिच्या तोंडचे ते शब्द आसवांनीं भिजून चिंब झाले होते.

मलाही गहिवर आवरेना. मी कडकडून चंदूला मिठी मारली. आम्हां दोघांच्या डोळ्यांतलीं आसवें एकमेकांत मिसळून गेलीं.

---

# एक दिवसाचें बिऱ्हाड

कोणती कुटुंबपद्धति चांगली याबद्दल आजकाल वाद माजून राहिला आहे. कुणी विभक्तपद्धति चांगली म्हणतात, तर कुणी अविभक्तपद्धतीचा पुरस्कार करतात. पण कोणत्याही परिस्थितींत अमुक एक पद्धतीच चांगली असं कांहीं निश्चितपणें कुणाला सांगतां यायचं नाहीं.

वासूला हाच प्रश्न पडला होता–म्हणजे आपल्या मोठ्या भावापासून विभक्त व्हावं असं त्याला वाटत होतं असं नव्हे—पण बायकोनं सारखी भुणभुण लावली, कीं वासूचं मन हेलकावे खाऊं लागे.

अगदीं पहिल्यापासून वासू एकमार्गी माणूस. शाळेंत जात असे तेव्हांसुद्धां अभ्यासापलीकडे त्याला कांहीं ठाऊक नसे. कुठल्याच मुलांत तो कधीं मिसळत नसे. खेळाची त्याला आवड नव्हती. पुस्तकांत डोकं खुपसून बसण्याचा त्याला जरी तिटकारा होता, तरी रिकाम्या वेळीं एकटंच फिरायला जाण्यापलीकडे कोणताच व्यायाम करणं त्याला आवडत नसे.

जें शाळेत, तेंच पुढल्या आयुष्यांत. मॅट्रीक झाल्यानंतर त्याला पोस्टखात्यांत नोकरी मिळाली. पगाराच्या प्रमोशनसाठीं रेंगाळणारं पोस्टासारखं दुसरं खातं नाहीं हें जरी खरं होतं, तरीही त्याच्या कर्तबगारीमुळं तीन चार वर्षांच्या मुदतींतच त्याला पंधरा वर्षांची मजल मारण्याइतका पगार मिळूं लागला.

सर्वांनाच त्याचा हेवा वाटत असे. वासूला तें कळत होतं, पण तो कुणाचीच कदर करीत नव्हता. पगार वाढावा म्हणून त्यानं कधींच खटपट केली नव्हती,

वरीष्ठांपुढं गोंडा घोळवला नव्हता, मध्यस्त्या, वशिले वगैरे भानगडींत तो कधींच पडला नव्हता. तरीही एकदम त्याला चाळीस पन्नास नंबर टाकून जेव्हां प्रमोशन देण्यांत आलं, तेव्हां इतरांपेक्षां त्याचं त्यालाच आश्चर्य वाटलं.

तोंवर सारा भार त्याच्या वडील बंधूंवर होता. कोर्टांतल्या कारकुनाला असून असून पगार तो काय असणार? नानांच्या नोकरीची सुरवात बारा रुपयांनीं झाली होती आणि उणीपुरीं बारा वर्षे नोकरी होऊन आतां कुठं त्यांना पंधरा रुपये पगार झाला होता. त्या वेळच्या रिवाजाप्रमाणं बऱ्याच अल्पवयांत त्यांचं लग्न झालं होतं. वासूचं लग्नसुद्धां त्या मानानं पहातां त्याच्या वयाच्या अठराव्या वर्षी म्हणजे अल्पवयांतच झालं होतं खरं, पण वासूचं लग्न झालं तेव्हां नानांना चांगलीं तीन मुलं झालीं होतीं.

आज वासूला दरमहा चाळीस रुपये मिळत होते. पण नानांचे पंधरा मात्र तिथंच थबकून राहिले होते.

बारा रुपये पगार असतांना कसावसा कुटुंबाचा भार सहन करून नानांनीं वासूला मॅट्रीक केलं. कांहीं अल्पस्वल्प वडिलोपार्जित पुंजी होती, आईचे चार दागिने होते, ते मोडून वटावून हे दिवस दिसले. वासू मॅट्रीक झाला, एकदम पंधरावर लागला, घरांत सत्तावीस येऊं लागले तेव्हां श्रीमंती आली असं नानांना वाटलं.

वासूला कांहींच वाटलं नाहीं. आपला अभ्यास कसा झाला, कुटुंबाचा खर्च कसा चालतो, तो खर्च चालण्यासाठीं कर्जाचा बोजा आपल्या माथीं चढला आहे कीं काय वगैरे बाबींची वासूला यत्किंचितही जाणीव नव्हती. तशी जाणीव करून घेण्याचा प्रसंगही कधीं त्याच्यावर आला नव्हता.

नानांनीं तक्रार केली असती तर हा प्रश्न त्याच्यापुढं उभा राहिला असता. कुटुंबाचं गाडं कसं रेटतं आहे याजबद्दल नाना कधीं अवाक्षरसुद्धां काढीत नसत. त्यांचीं जीं काय खलबतं चालायचीं तीं आईकडे. वासूला त्याची एवढीसुद्धां दाद नसे. वेळप्रसंग आला, तंगी वाटली, तर एकादं खिडुकमिडुक शोधायला नाना आईपुढं हात पसरीत नि ती आपल्या परीनं तो प्रसंग निभावून नेई. त्या प्रकाराची तीं दोघंही वासूला मुळींच दाद लागूं देत नसत.

त्या दोघांचंही वासूवर मोठं प्रेम होतं. वासू मोठा व्हावा, त्यानं नांवलौकिक

गेपावाया, कुटुंबाचं दैन्य दूर करावं असं वाटत असल्यामुळंच वासूला एवढीसुद्धां तोशिस लागूं नये असं त्यांना वाटे. नाना म्हणत, "पहिल्यापासून मी कष्ट काढतोंय. कष्टासाठींच माझा जन्म आहे. त्या माझ्या कष्टाचा वाटेकरी वासूला कशाला करूं ? त्याचं चाललंय तसं चालूं दे. त्याला कांहीं कळूं द्यायचं नाहीं. अगदीं आबादीआबाद चाललंय असं त्याला वाटलं तरच त्याच्या हातून अभ्यास होईल."

आणि झालंही तसंच. वासूचा अभ्यास सुखासमाधानानं झाला म्हणूनच तो पास झाला.

पण नानांच्या वात्सल्यामुळं तो अगदींच दुबळा होऊन बसला होता. स्वत:बद्दल कसलीसुद्धां काळजी घ्यायची संवय त्याला न लागूं देण्याची नानांनीं पहिल्यापासून खबरदारी घेतली होती. अंगांतले कपडे मळले आहेत, ते परटाकडे दिले पाहिजेत, हें सुद्धां नानांनीं सांगितल्याशिवाय त्याला कळत नसे. वासू आजारी पडला तर वैद्याकडून किंवा डॉक्टराकडून नानांनीं औषध आणून द्यावं तरच तो औषध घेई. न्हाव्याला आणून समोर बसवीपर्यंत आपली हजामत वाढली आहे हें सुद्धां वासूला कळत नसे.

तें असं एक वाढलेलं बाळ होऊन राहिलं होतं. विद्यार्थीदशेंतली ही परंपरा नोकरी पत्करल्यावर देखील त्यानं तशीच चालवली होती. परटाकडून आलेले कपडे बटणं लावून नानांनीं खुंटीवर ठेवले नसते तर तो तशाच मळक्या कपड्यांनीं ऑफिसांत गेला असता. त्याचा रुमालसुद्धां आपल्या डोक्यावर बांधून मग नाना तो खुंटीवर ठेवून देत—जपून ठेवून देत म्हणून तशाचा तसाच डोक्यावर ठेवून तो ऑफिसांत जाई. रुमाल मोडला असता तर वासू कदाचित् उघड्याबोडक्यानंच ऑफिसांत गेला असता.

पहिल्या तारखेला पगार झाला, कीं पगाराची पुडी तशीच्या तशीच आणून तो नानांच्या हातीं देई. त्या पुडींत किती रुपये आहेत हें त्यानं कधीं मोजून पाहिलं नाहीं.

नोकरी लागल्यानंतर कांहीं दिवसांनीं वासूला विड्या ओढायची संवय लागली. आतां काय करावं हा त्याला मोठा प्रश्न पडला. बरोबरच्या कारकुनां-बरोबर कुणी दिली तर ती विडी ओढून कांहीं दिवस त्यानं आपली तलफ

भागवली. पण पुढं त्याचं त्यालाच बरं वाटेना. एके दिवशीं तो नानांसमोर येऊन उभा राहिला. कांहीं तरी मागणी असावी असा तर्क करून नानांनीं विचारलं "काय हवंय रे वासू ?"

"विड्या हव्यायत !" वासू म्हणाला, "ऑफिसांत संवय लागली आहे—"

"किती विड्या हव्यायत रोज ?" नानांनीं विचारलं.

"तें मला कांहीं माहित नाहीं." वासू म्हणाला, "अजून घेतल्याच नाहींत कधीं विकत. कुणी दिली तर ओढीत होतों. पण आतां तें बरं वाटत नाहीं."

"ठीक आहे !" नाना उद्गारले.

दुसऱ्या दिवशीं ऑफिसांत गेल्यावर वासूनं खिशांत हात घातला तों पंचवीस विड्यांचं छोटं बंडल त्याच्या हाताला लागलं. आपण केवढा तरी श्रीमंत झालों असं वासूला वाटलं. आजवरचं ऋण फेडून टाकण्यासाठीं त्यानं ज्याच्या ज्याच्याकडून विडी घेतली होती त्याला त्याला मुद्दाम बोलावून विडी द्यायला सुरवात केली.

ऑफिसच्या कारकुनांना आश्चर्य वाटलं. 'अरे, वाश्याच्या खिशांत विड्या !' सगळेजण ओरडले. वासू नुसता हंसला.

दुसऱ्या दिवशीं ऑफिसांत जातांना सहज कोटाच्या खिशांत त्यानं हात घातला तों पंचवीस विड्यांची भरपाई झाली होती. आधल्या चोवीस तासांत वासूनं किती विड्या संपवल्या हें पाहून नानांनीं त्याप्रमाणं हिशोबाची तोंड-मिळवणी केली होती.

अशा रीतीनं वासू अगदीं दुबळा होऊन बसला होता हें त्याच्या बायकोला खपत नव्हतं. तिला वाटे, जास्तींत जास्त पगार मिळतो तो आपल्या नवऱ्याला आणि कमींत कमी पगार मिळत असून जास्तींत जास्त माणसं पोसावीं लागताहेत ती आपल्या दीराचीं. हा अन्याय होतो आहे असं तिला वाटे.

जुन्या काळचं कुटुंब. नवरा बायकोनीं एकमेकांशीं बोलायची संधी यायची ती एकांतांत—त्यांतून वासूला वाचनाचा फार नाद, रात्रीची वेळ तेवढीच काय ती त्याला फुरसदीची, त्याच वेळीं काय वाचन होईल तें—आणि तो वाचीत असला कीं त्याला विक्षेप केल्याचं मुळींच खपत नसे. अशा वेळीं बोलायचं म्हटलं तरी बोलायचं कसं अन् केव्हां ?

त्यांतून वासूचा स्वभाव फार धिमा. फार बोलणं त्याला मुळींच आवडत नसे. कुणीही कांहीं बोललं तरी प्रश्नापुरतं उत्तर द्यायचं अशी त्याची संवय असे. उगीच वाचाळपणा तो कुठंही, केव्हांही करीत नसे. त्यामुळं मन मोकळं करून त्याच्याकडे बोलायला त्याच्या बायकोला धीरच होत नसे.

एके रात्रीं मनाचा धडा करून तिनं त्याला विचारायला सुरवात केली.

"आपली बदली होणार आहे का इथून ?"

"छे, छे मुळींच नाहीं."

"पोष्टांतल्या बाकीच्या कारकुनांच्या बदल्या होतात, पण आपली बदली कशी नाहीं होत ?"

"कां ?"

"नाहीं—म्हटलं, तेवढींच चार गांवं जास्त पहायला मिळतील. जन्मभर एका गावांत डांबून रहायचं कसं आवडतं इकडे ?"

"मला इथंच रहाणं आवडतं."

"पण मी केव्हां दुसरीं गावं पहावीं ?"

"मग जा कीं तुला वाटेल तिकडे."

"मी कशी जाऊं एकटी ? कुणी तरी नेलं पाहिजे ना मला ! अन् गावं पहायचीं म्हणजे कांहीं तीर्थयात्रा करायची नाहीं. ते आपले नागोबा आहेत, त्यांची गेल्या वर्षांत चार ठिकाणीं बदली झाली. परवां देवळांत गेलें होतें तेव्हां त्यांची बायको भेटली होती. किती किती गोष्टी सांगत होती प्रत्येक गावच्या !—"

"उद्यांपासून देवळांत जाऊं नकोस म्हणजे ती भेटायची नाहीं."

"जाऊं नकोस म्हणून कसं चालेल ? सासूबाईनीं हांक मारली कीं नको का जायला त्यांच्याबरोबर ? त्या देखील बसल्या होत्या ऐकत तिच्या गोष्टी."

"मग आईनं कुठं तक्रार केली नाहीं ती ?"

"त्यांचं काय, त्यांना घराचीच तेवढी माया आहे. फिरायच्या काळांत त्या फिरल्या आहेत. त्यावेळच्या किती तरी गोष्टी त्या सांगतात. तेव्हां आपलं मनाला वाटतं, आपण सुद्धां अशीं चार गावं पहावीं, चार ठिकाणच्या ओळखी-देखी व्हाव्या, चोहींकडेच लागेबांधे जोडून घ्यावे—"

तिचं बोलणं थांबलं. वासूही उगीच राहिला. प्रश्नच नव्हता, मग तो

उत्तर कसं देणार ? ते नुसते तिचे उद्गार होते. ते उद्गार ऐकून त्यानं एक मोठा सुस्कारा टाकला.

तिनं विचारलं, "एवढा मोठा सुस्कारा टाकायला काय झालं ?"

"काय झालं कोण जाणे. छातींतून भरून आला सुस्कारा—टाकला बाहेर !"

"इकडे बोलायचीच मुळीं सोय नाहीं !" असं म्हणून ती स्वस्थ राहिली जो विषय काढावा असं तिच्या मनांत होतं त्या विषयाचा उपक्रम तिला करत आला नाहीं.

दुसऱ्या दिवशीं ऑफिसांत जायच्या पूर्वी वासू जेवायला बसला असतांन बोलणं निघालं. रोज आईनंच जेवण करावं आणि आईनंच वाढावं असा त्याच हट्ट असे. बायको काय किंवा भावजय काय, आईच्या हाताजवळ काम करीत असत. आईलाही जेवण करायची मोठी हौस होती. तिला त्यांत कष्ट वाटत नसत म्हणून जेवण करायचं काम ती कधींच सुनांवर टाकीत नसे. पाटपाणी करणं संध्येला ठेवणं, पूजेची तयारी करणं—फार तर अन्नशुद्ध आणि ताक वाढण एवढींच कामं काय तीं सुना करीत. त्यांतून नानांच्या बायकोला मुलं संभाळावं लागत. तिचा बहुतेक वेळ तिकडेच जात असे.

त्या दिवशीं अन्नशुद्ध वाढायला बायको आली तेव्हां वासूला रात्रीच्या भाषणाची आठवण झाली. तो म्हणाला, "बदलीची हौस आलीय हिला !"

"कुणाला ?" आईनं विचारलं, "धाकट्या सूनबाईला का ?"

"हो."

"खरंच तें. काल नागूची बायको भेटली होती देवळांत. बिचारा नागू रडतो बदल्या होतात म्हणून अन् त्या मेलीला मिरवायला हवं चार गावांतून. पण या बदल्यांपायीं माणूस कसा खर्चांत येतो याची तिला काय कल्पना ? त्या दिवशीं नागू भेटला होता. तो म्हणाला, 'गांजून गेलोंय या बदल्यांच्या पायीं. बायको अन् हें पोरांचं लेंढार घेऊन सामानसुमानासकट दर तीन महिन्यांनी गावोगाव हिंडायचं म्हणजे टेकीला येतो जीव ! वाटचालीचा भत्ता मिळतो त्याच्या दुप्पट खर्च होतो. अन् मग कर्ज काढावं लागतं !' त्याच्या बायकोला कुठं आहे हें ठाऊक ? ही भेटली असती आधीं म्हणजे मी सांगितलं असतं नागूला, की म्हणावं पगार दे बायकोकडे अन् तिलाच म्हणावं खर्च चालवून दाखीव. तसंच

काल मी तिला सांगणार होतें. पण कशाला म्हटलं—येईल अनुभव तेव्हां कळेल तिला आपोआप."

"ऐक !" वासू कोपऱ्यांत उभ्या राहिलेल्या बायकोकडे पाहून म्हणाला.

"काय ऐक ?" आईनं विचारलं.

"हें आतां तूं सांगितलंस तें."

"तिला काय कळतंय ? तुम्ही दोघे एका जागीं आहांत म्हणून घरखर्चाची तोंडमिळवणी होते. नानालाच विचार म्हणावं, म्हणजे कळेल. बारा रुपये मिळत होते तेव्हांपासून संसाराचा बोजा उठवून त्यानं तुझी शाळा केली. म्हणून ना आज तुला एवढा पगार मिळतोय ? त्याला बिचाऱ्याला कांहीं विंग्रजीचा गंध लागला नाहीं. किती वाईट वाटतं त्याला ! पण हें सारं तुझ्यासाठींच ना केलं त्यानं ?—"

"आतां ऐक." पुन्हां बायकोकडे पाहून वासू म्हणाला तेव्हां ती फण-काऱ्यानं सैंपाकघरांतून निघून गेली.

वासू मुकाट्यानं जेवीत होता. तितक्यांत नाना दाराशीं आले आणि म्हणाले, "काल विडया पुरल्या नाहींत वाटतं वासू ? आज बारा विडया जास्त ठेवल्यायत हं खिशांत !"

वासू नुसता हंसला. ताकाची कथली शोधण्यासाठीं आंत आलेल्या वासूच्या बायकोच्या अंगाचा ते शब्द ऐकून जळफळाट झाला. ताकाच्या गाडग्यांतली रवी बाजूला फेंकून कथलींत ताक ओतून घेऊन ती वासूच्या पुढं आदळून ती निघून गेली. तरीही वासू हंसत होता.

"आज काय झालंय सूनबाईला ?" आई उद्गारली. पण वासू कांहीं बोलला नाहीं.

त्या दिवशीं रात्रीं वासू पुस्तक वाचीत पडला होता. अगदीं लडिवाळपणानं जवळ येऊन तिनं त्याच्या हातचं पुस्तक काढून घेऊन बाजूला ठेवलं. वासू नुसता पहात राहिला.

क्षणभर तीही अंदाज घेत होती. पुस्तक काढून घेतल्यामुळं तो रागावला आहे कीं काय हें तिला निश्चित ठरवतां येत नव्हतं.

वासूच्या भुंवया नुसत्या वर गेल्या. हंसण्याची अगदीं बारीकशी झुळुक

त्याच्या चेहऱ्यावरून निसटून गेली असं पाहून ती म्हणाली, "राग नाहीं ना आला?"

"छे, छे!—काय आहे?"

ती बोलत होती आणि तिच्या प्रत्येक वाक्याला तो धिमेपणानं हुंकार देत होता.

ती म्हणाली, "बदलीचं मी बोललें तें कांहीं इतकं पटलं नाहीं. पण असं पहायचं, या वयांत आपण दोघांनींच एका जागीं रहावं असं मला वाटणं साहजिक नाहीं का? तसा कांहीं इथं मला त्रास नाहीं—कामसुद्धां पडत नाहीं—पण तेंच वाईट वाटतं मला. आपण जेवण करावं, आपणच तें इकडे वाढावं अन् नंतर इकडच्या तोंडचे चार शाबासकीचे शब्द ऐकले कीं मला पोट भरल्यासारखं वाटावं—असं कांहीं तरी व्हावं असं नाहीं का इकडे वाटत?—"

त्याचे हुंकार सुरू होते, म्हणून ती उत्तरासाठीं थांबली. बिछान्यावर पडल्या पडल्या वासू नुसता तक्तपोशीकडे पहात होता. त्याच्या चेहऱ्यावर एवढासुद्धां पालट होत नव्हता त्यामुळं तिचं मन गोंधळांत पडलं. आपलं बोलणं त्याला पटलं कीं पटलं नाहीं हें कांहींच तिला कळेना. पुढं बोलावं कीं बोलूं नये याचा ती विचार करीत होती तोंच त्याच्या तोंडून पुन्हां एकदां एक मोठा हुंकार आला. पुढं बोलायला हें उत्तेजन आहे असं आपल्या मनाशीं ठरवून ती म्हणाली,"—आपलं हें घर मोटं आहे. अर्धा भाग भाड्यानं द्यावा म्हणून मागं एकदां भावजी म्हणत होते. पण त्याच वेळीं इकडचा पगार दहा रुपयांनीं वाढला—चाळीस झाले अन् तो बेत तसाच राहिला. त्याचवेळीं जाऊबाई बाळंत झाल्या. पांचवं मूल झालं. तसं पाहिलं तर मुलं म्हणजे कांहीं मोठीं माणसं नव्हेत. त्यांच्या मुलांच्या खस्ता त्या काढतात. माझ्यावर भार पडूं देत नाहींत. अन् म्हणूनच हें रिकामं बसून रहाणं मला आवडत नाहीं—" पुन्हां ती क्षणभर थांबली. तिनं पाहिलं, तों वासू तसाच तक्तपोशीकडे पहात होता. चेहराही तसाच निर्विकार होता—एक क्षणभरच तिला वाटलं, कीं पूर्वीप्रमाणें तशीच हंसण्याची लहानशी लकेर त्याच्या चेहऱ्यावरून निघून गेली. अवसान घेऊन ती पुढं म्हणाली, "—पूर्वीपासून त्यांना संवय आहे. तेवढ्या पगारांत त्यांचं बरं चालेल. इकडे चाळीस रुपये मिळतात, त्यांना पंधरा मिळतात. तीं दोन माणसं अन् पांच मुलं—आपण सारीं दोनच माणसं!—"

"अन् आई ?" तेवढ्याच निर्विकार मुद्रेनं वासूनं विचारलं.

आणखी अवसान येऊन ती हळूच हंसून म्हणाली, "सासूबाईंचं काय, कांहीं दिवस त्या आमच्याकडे रहातील, कांहीं दिवस त्यांच्याकडे रहातील—नाहींतर त्यांना भावजींकडे रहावं असंच वाटत असलं तर तिकडेच रहातील, तीर्थयात्रेसाठीं कांहीं जरूर लागली त्यांना तर द्यावं आपण—" ती पुन्हां क्षणभर थांबून बरंचसं अवसान घेऊन म्हणाली, "—असं कांहीं केलं तर चार पैसे संग्रही पडतील. एक मोहनमाळ हवीसं वाटत होतं मला. पण कशी मागायची ? चार चौघींबरोबर गेलें, कीं आपलाच गळा आपल्यालाच ओका ओका वाटतो ! नाहीं ?"

कुशीवर वळून वासू म्हणाला, "मग काय म्हणणं तुझं ?"

"रागवायचं नाहीं बरं." शक्य तितक्या लाडिवाळपणानं ती म्हणाली, "म्हटलं, बिऱ्हाड करायचं !--दुसरीकडे नव्हे, इथंच—या घरांत. व्यवहार निराळा करायचा. त्यांना जरूर लागली अन् आपण हातानं उचलून कांहीं दिलं तर तें मदतीच्या हिशेबीं पडतं. आतां जसे कांहीं तेच सारा खर्च करताहेत ! तसं नको व्हायला ! नाहीं ?"

"ठीक !" पुन्हां तक्तपोशीकडे पहात वासू म्हणाला, "उद्यांपासून आपण विभक्त होऊं."

"उद्यां नाहीं, परवांपासून !" ती म्हणाली.

"ठीक ! परवांपासून !"

तिचा आनंद गगनांत मावेना. एवढ्या सरळपणानं हें प्रकरण निभावेल असं तिला वाटलं नव्हतं.

* * * *

दुसऱ्याच दिवशीं सकाळीं नाना पूजा संपवून उठले तेव्हां वासू म्हणाला, "उद्यांपासून विभक्त व्हायचंय. अर्धी वाटणी करायची घराची—अन् सामानासुमानाची. तिला कोणती जागा सैंपाकघराला पाहिजे तें विचारून ठरवून टाका."

"बरं आहे." असं म्हणून नाना गोमुखींत माळ घालून जपाला बसले.

सारे व्यवहार नित्याप्रमाणें झाले. वासूची बायको अगदीं खुषींत होती. त्या दिवशीं संध्याकाळीं कोर्टांतून आल्याबरोबर नानांनीं भांडींकुडीं काढून वासूच्या बायकोच्या हवालीं केली. ते म्हणाले—"सध्यां घरांत आणलेलं जें कांहीं धान्य-

धुन्य असेल त्यांतूनच तुला जरूर लागेल तें घे. पुढल्या पहिले तारखेपासून तुमचं तुम्हीं आणीत जा...पण नको, वासूला तें जमायचं नाहीं. सामानाची यादी तूं माझ्याकडे देत जा. मी सारं कांहीं आणून देईन. सामान ठेवायला डबे, भांडीं वगैरे काय पाहिजे असतील तीं सुद्धां तेव्हांच आणूं. तोंपर्यंत कसंबसं आहे या सामानांतच भागवून घे--"

नानांनीसुद्धां साऱ्या गोष्टी इतक्या साहजिकपणं घेतल्याचं पाहून वासूच्या बायकोचा जीव खालीं पडला.

त्या दिवशीं संध्याकाळपासून ती नव्या बिऱ्हाडाच्या तयारीला लागली होती. दुसऱ्या दिवशीं आपण सैंपाक करून वाढणार—आपल्या सत्तेच्या बिऱ्हाडीं आपण नि आपला नवरा आतां अगदीं मालकी हक्कानं मिरवणार—या अपेक्षित घटनेच्या आनंदांत बेहोष होऊन ती काम करीत होती.

त्या रात्रीं नवराबायकोचं या प्रकरणीं कांहीं बोलणं झालं नाहीं. सारं कांहीं सुरळीत झालेलं असल्यामुळं उगीच एव्हां कशाला बोला असा विचार करून तिनंही तोंडाला खीळ घातली.

दुसऱ्या दिवशीं ती कामाला लागली. स्नानाचं पाणी सुद्धां स्वतः तापवून तिनं न्हाणीघरांत नेऊन ठेवलं. नित्याप्रमाणं धोतर चुणूनही तिथंच ठेवलं. पाट-पाणी, संध्येची तयारी करून आतां नवरा येणार म्हणून वाट पहात ती आपल्या सैंपाकघरांत उभी राहिली होती.

एवढी व्यवस्था झाली तरी आईच्या बाबतींत कुणीच कांहीं शब्द काढला नव्हता. तिनंही कांहीं विचारलं नव्हतं. नित्याप्रमाणं ती आपल्या सैंपाकघरांत सैंपाक करीत होती. नानासाठीं एकच पाटताट ठेवलं होतं. वासूला नानांपेक्षां लवकर ऑफिसांत जावं लागे, म्हणून तो रोज आधीं जेवून जात असे. तोंपर्यंत नानांचं जपजाप्य चाले.

आई नानाची वाट पहात बसली होती तोंच वासू आंघोळ करून सैंपाकघरांत आला. त्यानं इकडे तिकडे पाहिलं. नानांचाच तेवढा पाट मांडलेला दिसून येतांच त्यानं दुसरा एक पाट घेऊन आपल्या रोजच्या जागीं ठेवला. उभ्या आयुष्यांत त्यानं कधीं आपला पाट किंवा तांब्या भरून घेतला नव्हता. आज स्वतःच तो आपलं पाटपाणी करतो आहे असं पाहून आई म्हणाली, "हें रे काय वासू?"

" कांहीं नाहीं—" वासू म्हणाला, " मला घाई आहे ऑफिसांत जायची. लवकर गेलं पाहिजे. संध्या करायला देखील वेळ नाहीं मला. वाढ लवकर."

आंघोळ करून वासू चुकून जुन्या जागीं गेला अशी कल्पना करून त्याची बायको आपल्या सैंपाकघरांतून धांवत जुन्या सैंपाकघराकडे आली. स्वत: आपलं ताटपाट घेऊन तो बसतो आहे असं पाहून स्तंभित होऊन ती दाराशींच उभी राहिली.

" अरे, पण तुझं जेवण तिकडे केलंय ना तिनं ?" आईनं विचारलं.

" माझं नव्हे !" वासू म्हणाला, " ती विभक्त झालीय, तिचं जेवण रांधतेय ती तिकडे. आजवर मी कधीं तुझ्या हातच्या खेरीज जेवलों नाहीं अन् यापुढं जेवणार नाहीं. तुझे हातपाय चालताहेत तोंवर तुझ्याच हातचा घास माझ्या तोंडीं जायचा—"

" अरे. पण ती "— आई दचकली. तिनं दाराकडे पाहिलं. सूनबाई तिथं उभी होती—अगदीं काष्ठ होऊन उभी होती.

" असं काय करतोयस रे वासू ?" आई उद्गारली. " एवढ्या ह्यानं तिनं सारं कांहीं केलंय—"

" काय केलंय तें तिनं तिच्यासाठीं !" वासू शांतपणें म्हणाला, " आजवर माझं जसं चाललंय त्याच्यांत एवढा मुद्धां फरक व्हायचा नाहीं. विभक्त झाली आहे ती ती—मी नव्हे. वाढतेस कीं जाऊं उपाशीं ?"

" अगदीं मुलखावेगळा माणूस आहेस तूं वासू !" असं म्हणून मोठ्या कष्टानं तिनं वाढायला सुरवात केली.

धुसपुसत, हातपाय आपटीत सूनबाई निघून गेली. वासू यथेष्ट जेवून ऑफिसांत गेला पण त्याची बायको स्वतःच्या घरीं स्वतः सैंपाक केला असून सुद्धां उपाशीं राहिली.

* * * *

दुसऱ्या दिवशींच तें नवं बिऱ्हाड मोडलं.

# कुणासाठीं लढाई ?

लढाईची त्याला फार खुमखुम होती. मराठ्यांच्या मर्दुमकीच्या हकीकती तो दररोज ऐकत होता. मोहित्यांच्या घराण्यांत त्याचा जन्म झाला असल्यामुळें, आलेल्या परंपरागत दंतकथा दररोज त्याच्या कानीं पडत होत्या.

त्याला लिहितां वाचतां येत होतें. 'केसरी'चा तो मोठा भक्त होता. दर बुधवारीं पोष्टाच्या दारावर उभा राहून, पोष्टमनबरोबर संधान बांधून, कुणाचा ना कुणाचा 'केसरी' तेव्हढ्या वेळांत तो वाचून काढीत असे. नुसती दोरी सोडायची, वाचायचा, पुन्हा तशीच दोरी बांधून, पोस्टमन हद्दीवर बाहेर जायला निघाला म्हणजे हळूच त्याच्याकडे परत करायचा.

त्यावेळीं दोघांत वाद लागला होता, आपण लढाईवर जावें कीं न जावें. गांधीजी विरोध करीत होते, आणि लढाईवर जावें असें लोकमान्य म्हणत होते. असहकार करण्याच्या गांधीजींच्या वृत्तीवर केसरींतून नाजूकपणें कोरडे हाणले जात होते.

लोकमान्यांचें म्हणणें त्याला तंतोतंत पटत होतें. लढाईची संधि आली आहे तिचा फायदा कां घेऊं नये ?

रिक्रूटिंग जोरांत सुरू होतें. एका संस्थानिकाचे बंधू रिक्रूटिंग ऑफिसर म्हणून कोंकणांत होते. उमेदवार म्हणून त्यांच्यासमोर हजर होण्याची त्यानें तयारी केली.

बापाला त्यानें सांगितलें तेव्हा तो म्हणाला, "आपलं घराणं लढवय्याचं आहे. आपले भाऊबंद आज पलटणींत आहेत. सुभेदार–मेजर होऊन पेन्शन घेत

घरीं बसलेले आहेत भाऊबंद कांहीं थोडेथोडके नाहींत. जातील तिथें त्यांनीं मर्दुमकी गाजवली आहे. सुभेदार–मेजर होणं कांहीं लुंग्यासुंग्याचं काम नाहीं. मोठमोठ्या साहेबांच्या तोडीची ती पदवी आहे—"

"मग मीही सुभेदार–मेजर होईन." तो अभिमानानें छाती फुगवून म्हणाला.

"थांबा–थांबा–थांबा," त्याचा बाप अगदीं शांतपणें चिलमीचे झुरके देत म्हणाला, "सुभेदार–मेजर झाले; भलं मोठं पेन्शन मिळालं, घरीं आले–एव्हढा मोठा कलेक्टर पण हाताला हात लावतो त्यांच्या. पण मिळवलं काय? हा कसला मान? कुणासाठीं मिळाला? आज लढाई सुरू आहे. आमचे भाऊबंद तिकडे जाऊन मरताहेत, कुणी लंगडेपांगळे होऊन परत येताहेत; पण हें कुणासाठीं?—"

त्याला सुद्धां प्रश्न पडला—कुणासाठीं?

"—पूर्वी आमचे वाडवडील लढले. औरंगजेबाची सनद बगलेला मारून साताराची गादी बळकावण्यासाठीं शाहू दक्षिणेत आला तोवर मोहिते आपलं रक्त सांडीत आले होते. वारणेचा तह झाला—आपापसांतली यादवी मिटली अन् तेव्हांपासून मोहित्यांनीं आपली तलवार म्यान केली. त्या मोहित्यांचीं आम्ही पोरंबाळं. लढूं तर मराठ्यांच्या गादीसाठीं, छत्रपतीच्या स्वराज्यासाठीं, असं म्हणूनच ना आम्ही आमची तलवार म्यान केली? साताराची गादी मोंगलांच्या मांडलीकांची गादी झाली तेव्हां आम्ही स्वस्थ बसलों—भाऊबंदांवर वार करायचा नाहीं म्हणून स्वस्थ बसलों. ते आतां कुणासाठीं लढायला निघणार? काय आमचं वाईट केलंय् त्या लोकांनीं? नि काय आमचं बरं केलंय् या लोकांनीं? साहेबानं हुकूम करावा नि शिपाई मराठ्यानं गोळी झाडावी, हीच ना ती मर्दुमकी? हुकुम सोडायला कांहीं हे नेत नाहींत ना आम्हाला लढाईवर?—"

"आज शिपाई म्हणून जातों आम्ही," तो म्हणाला, "पण उद्यां सेनापति होणार नाहीं कशावरून?"

"कायदा आहे ना तसा," चिलीम उपडी करून झाडीत म्हातारा म्हणाला, "सुभेदार करतील पण कर्नलचा हुद्दा कांहीं मिळायचा नाहीं. मराठी पदवी आहे ना ती सुभेदाराची? कमानी जनरल का होणार आहेस तूं?—या जन्मीं तरी ही कल्पना डोक्यांत आणूं नकोस—"

"कुणी सांगावं," तो म्हणाला, "सरकारनं लढाई जिंकली नि आम्हाला कमानी साहेब करूं लागले तर?"

म्हातारा मोठमोठ्यानें हंसला आणि म्हणाला, "जा बाबा, जा, मरायचंच असलं तुझ्या नशिबीं तर मी तरी कशाला आड येऊं? बापाचं काळीज म्हणून वाटतं. काळीज बापाचं असलं तरी तें मराठ्या बापाचं आहे. लढाईच्या मैदानावर धांवणाऱ्या पोराला मराठ्याचा बच्चा कधीं मागें खेचणार नाहीं—" म्हातारा थांबला, तेव्हां त्याला फार आनंद झाला. इतक्या लवकर परवानगी मिळेल असें त्याला वाटलें नव्हतें.

बटव्यांतील तंबाखू काढून देठाचे तुकडे करीत म्हातारा म्हणाला, "—पण जुन्या गोष्टी आठवतात. रायगडच्या वाटेला आड आला म्हणून चंद्रराव मोऱ्याला शिवाजी महाराजांनीं कापून काढलं. जावळींतलं डोकंन् डोकं महाराजांच्या बाजूचं होतं पण मालक होता मोंगलांच्या बगलेंत. नि आम्ही मराठे मोठे स्वामिभक्त! मालकाविरुद्ध कसं जायचं? आपला कोण, परावा कोण, हें महाराजांना कळत होतं. एका पराव्यासाठीं हजार आपल्यांना कां मारायचं म्हणून ना महाराजांनीं मोऱ्याला कापून काढलं! तसाच तो बाजी घोरपडे! तो काय मराठा नव्हता—तो काय मर्दाचा बच्चा नव्हता? पण कां त्याचं मुंडकं छाटलं महाराजांनीं? म्हणून विचारतों, बाबा, आधीं आपल्या मनाला विचार, कुणासाठीं जातोस? अन् मग खुशाल जा."

म्हाताऱ्याची भाषा त्याला कळली नाहीं. तो नकार होता कीं होकार होता, याचा त्याला अंदाज येईना. जा म्हणून परवानगी मिळाली एव्हढेंच तो धरून चालत होता—पण कोणत्या अटीवर?

रिक्रूटिंग ऑफिसरसमोर जाऊन तो उभा राहिला. पण त्यानें प्रश्नांना सुरवात केली, "कुणासाठीं ही लढाई?"

ऑफिसर मोठमोठयानें हंसले. "काय वेड्यासारखा प्रश्न! 'मराठा तितुका मेळवावा' असं सरकारनं काढलेलं फर्मान नाहीं का वाचलंस तूं? ते पूर्वीचे दिवस गेले बाबा आतां. आज सरकार शिवाजीच्या नांवानं हाक मारतंय. रामदासाच्या बोलीनं हाक मारताहेत–पूर्वी नांवसुद्धां कुणी घेत नव्हते. बंदी होती सरकारची. आतां सरकारच नांवं घेऊं लागलं—असा आहे हा लढाईचा गुण—"

"पण कुणासाठीं ही लढाई?" त्यानें पुन: विचारलें.

"अर्थात् आपल्या देशासाठीं." ते म्हणाले.

"पण आपल्या देशांत कुठं चाललीय ही लढाई? काय संबंध आहे आपल्या देशाचा?"

"संबंध कसा नाहीं? लढाईचं लोण इथपर्यंत येऊन आज पोंचलं नाहीं पण उद्यां येणार नाहीं कशावरून? इथं रत्नागिरीच्या लोकांनीं देखील ती बोट जातांना पाहिली म्हणतात. उद्यां असंच एकादं मन्वार आलं आणि त्यानं उतरला आपला कबिला किनाऱ्यावर तर काय करणार आम्ही? माझं बोलणं राहूं द्या, पण 'केसरी' काय म्हणतो पहा ना? तो तर सरकारी नाहीं? पूर्वी त्यालाच शिक्षा झाली होती ना राजद्रोहाबद्दल? पण आतां आम्ही केसरीच्याच भाषेंत चालवलंय ना रिक्रूटिंग—" 'केसरी'चें नांव घेतांच त्याचें तोंड बंद झालें. 'केसरी'वर त्याची देवतुल्य भक्ति होती.

त्यानें नांव लिहून दिलें.

म्हाताऱ्याला जाऊन सांगितलें तेव्हां तो म्हणाला, "ठीक केलंस! जा एकदां अन् स्वत:च्या डोळयानीं बघून ये. डोळे झाकून जातो आहेस, जगून परत आलास तर डोळे उघडतील—मेलास तर आहेतच मिटलेले डोळे!"

बापाचे ते निष्ठुर उद्गार ऐकून त्याला असमाधान वाटलें. मराठ्याची जात —मरायला भीत नाहीं कधीं, पण हें 'डोळे उघडणे आणि मिटलेले राहाणें' हें त्याला कांहीं कळलें नाहीं.

त्याच्या आईनें रडून आकांत केला. पुढल्याच महिन्यांत त्याचें लग्न होणार होतें. साखरपुडा झाला होता. त्या भावी सासऱ्यानें येऊन समजूत घालायचा प्रयत्न केला.

त्याला कुणाचाच बुद्धिवाद पटेना. भावी वधु त्यानें पाहिली होती. शेजारच्याच गांवची मुलगी. नक्षत्रासारखी सुंदर होती.

भावी सासरा म्हणाला, "फांसावर चढणाऱ्याच्या गळयांत कांहीं माझी पोरगी मला बांधायची नाहीं. तुझ्याशीं लग्न लावून आपल्याच हातानं पोरीचं कुंकूं कसं पुसून टाकूं? अन् वाट तरी किती दिवस पाह्यची? सहा महिन्यांत लढाई संपेल असं लोक म्हणत होते पण आतां वर्षावर वर्ष होत चाललीं. म्हातां-

धुती मुलगी, किती वर्षं वाट पहात बसणार? लढाईवर गेलास कीं दुसऱ्या दिवशीं तिचं लग्न लावून देईन. थोड्‍ शिरका मागणी घालतोय आपल्या लेकासाठीं. पण मोहित्यांच्या कुळाकडे बघून नाहीं म्हणत होतों. पण आतां हाक मारून बोलावीन त्याला आणि पोरगी गळयांत बांधीन. तूं जा तर खरा पलटणीबरोबर कीं दुसरे दिवशीं तुझ्या हातांत पत्रिका पडते आहे लग्नाची!"

त्याचे मन डळमळूं लागलें. सुंदर बायकोचा मोह त्याला आवरेना.

लढाईच्या खुमखुमीनें त्याचें मराठ्याचें रक्त सळसळत होतें. तो लढाईवर निघून गेला.

त्याची भावी वधू शिरक्यांची सून झाली.

* * * *

बसऱ्याच्या लढाईच्या मैदानावर त्याची नेमणूक झाली होती. लढाई कुठें चालली आहे याचा त्याला पत्ता सुद्धां नव्हता. हॉस्पिटलमधें जखमी शिपाई आले म्हणजे त्याला लढाईची कल्पना येई.

एकदांचें त्याला फ्रंटवर पाठवण्यांत आलें. कुठून तरी गोळया येत होत्या—हुकूम झाला कीं तो गोळया झाडीत होता—कुणावर? ते कांहीं त्याला कळत नव्हतें. त्याला वाटलें, हीच का लढाई?

पुन: त्याला बेस ऑफिसमधें पाठवण्यांत आलें. कां तें त्याला कळलें नाहीं.

त्याला वाटलें, ही कांहीं मराठ्यांची लढाई नव्हे. कां चालल्या आहेत या हालचाली? हें इथें काय चाललें आहे, तें कोण आपल्याला समजावून सांगणार?

पुन: एकदां त्याला फ्रंटवर पाठविण्यांत आलें. त्यावेळीं त्यांचा जय झाला म्हणून सगळे म्हणूं लागले. गोरे शिपाई गावांत घुसले.

ओझ्यांच्या लॉरींत बसून तो पुन: बेस ऑफिसला आला.

त्याला जमादार करण्यांत आलें होतें. एक फीतही मिळाली होती.

पण त्याला जमादार कां करण्यांत आलें हें त्याचें त्यालाच कळलें नाहीं. कोणत्या मर्दुमकीसाठीं ही फीत मिळाली हेंही त्याला सांगतां आलें नसतें. त्यानें आपल्या साहेबालाही विचारून पाहिलें तेव्हां तो म्हणाला, "तुला कशाला ही उठाठेव? बढती मिळाली ना? फीत मिळाली ना? उद्यां तूं गांवीं जाशील,

लोक तुझं कौतुक करतील, म्हल्या थोड्या काळांत तूं जमादार झालास हें कळलं तर आपल्याला आणखी रिक्रूट मिळतील. माणसं मरताहेत त्यांची भरपाई झाली पाहिजे ना ?"

"किती दिवस चालणार ही लढाई ?"

"त्याच्याशीं तुला् मला काय करायचंय् ? चालते बोलते आहोंत तोंपर्यंत आपण लढूं या. लढाई कदाचित् उद्यां थांबेल, कदाचित् पांच वर्षेही चालेल, त्याची पंचाईत तुला कशाला ?"

तो साहेब तसाच गोड्या स्वभावाचा होता म्हणून इतकं तरी बोलला. इतरांना उत्तरें मिळत होतीं कुठें ?

तो देवाला नवस करूं लागला.

देवानें त्याची प्रार्थना ऐकिली. त्याचा बाप अत्यवस्थ आजारी आहे अशी तार आली.

रजा मिळणें कठीण होतें--पळून जाणें शक्य नव्हतें.

त्यानें विनवण्या केल्या, काकुळत्या भाकल्या--पण त्याला रजा मिळाली नाहीं.

असाऱ्याला जायचा हुकूम आला होता. त्याची लढाईची खुमखुमी जिरली होती. पुढल्या प्रसंगाची कुणालाच खात्री नव्हती. जनरल टाऊनशेन्डच्या हालचालीवर पुष्कळांचा अविश्वास होता.

त्याच दिवशीं त्याला तार आली,--त्याच्या बापानें स्वर्गाची वाट धरली होती.

* * * *

बाप मेला तरीही त्याला रजा मिळाली नाहीं. वीराचें जिणें हें असें आहे.

पुनः तो आपल्या मनाशीं विचार करूं लागला–बापाचे शब्द त्याला आठवले--त्याला वाटलें, आपल्या शेजारीं उभा राहून आपला बाप आपल्याला विचारतो आहे, "कुणासाटीं ही लढाई ?"

त्या प्रश्नानें त्याला भंडावून सोडलें. त्याच्या बापाची छाया त्याला पुनः पुनः तो एकच प्रश्न करीत होती. कुणासाटीं हा मनुष्यांचा संहार ?

त्यानें मागें वळून पाहिलें,--हिंदुस्थान हजारों मैल दूर होता. कांहीं धोका नव्हता हिंदुस्थानाला.

अन् मग हा धोका कुणाला होता ? पुनः तो आपल्या मनाला विचारूं लागला. आपल्या मनांत देव उभा राहिला आहे अशी कल्पना करून विचारूं लागला, "कुणासाठीं ही लढाई ?"

समोरून गोऱ्या शिपायांची एक कंपनी मार्च करीत निघून गेली.

त्याला वाटलें, देवानें उत्तर दिलें.

* * * *

छावणीशेजारच्या खजुरीच्या झाडावर तो चढूं लागला. अर्धे झाड चढून गेल्यावर त्यानें खालीं पाहिलें--चोहोंकडे छावणी पसरली होती. जिकडे तिकडे गडबड सुरू झाली होती. बांधाबांधी सुरू होती. राहुट्या मोडल्या जात होत्या. मोटार लॉऱ्या पळत होत्या. खेचरांच्या गाड्या चालू झाल्या होत्या.

त्याला प्रश्न पडला, "कुठं निघाले आहेत हे लोक ? कुणासाठीं ? कुणासाठीं ? कुणासाठीं ?"

त्याचे हात थरथरूं लागले--त्याला चक्कर येऊं लागली.

धाडकन् तो खालीं पडला.

त्याला हॉस्पिटलांत नेण्यांत आलें. त्याचा पाय मोडला होता.

कोर्ट मार्शल भरविण्यांत आलें. त्यानें काढलेले असमाधानाचे उद्गार सांगणारे साक्षीदार उभे करण्यांत आले. आघाडीवर जायचें टाळण्यासाठीं त्यानें मुद्दाम अपघात करून घेतला असा आरोप त्याच्यावर ठेवण्यांत आला.

नोकरी गेली तसाच त्याचा पायही गेला.

लंगडा बाळू मोहिता, कोंकणच्या एका खेड्यांत आज भिक्षा मागून पोट भरतो आहे. शिरक्याच्या सुनेच्या दारीं भीक मागण्यासाठीं तो जातो तेव्हां त्याला प्रश्न पडतो, "कुणासाठीं झाली ती लढाई ?"



# तिचा 'हा'

वेश्येची मुलगी म्हटलें म्हणजे तिला राग येत असे. हिंदु लोकांतले बारीक मारीक जातिभेद चातुर्वर्ण्यापलीकडले आहेत याची कितीजणांना कल्पना आहे ? ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, एवढ्याच कांहीं जाती नव्हत. ती जातीबद्दल भांडूं लागली म्हणजे तिला हाच प्रश्न केला जात असे.

आणि त्या प्रश्नाचें उत्तर देणें तिला कठीण जाई. तिनें आपल्या आईला विचारलें, पण ती तरी बिचारी काय सांगणार होती ? आपली जात कलावंतीण एवढेंच तिला माहीत होतें. पण चातुर्वर्ण्याच्या चार जातींतील कोणत्या जातींत आपला समावेश होतो, याचें उत्तर तिला कोणीच देईना.

ती शाळेंत जात असे. यंदा ती मॅट्रिकच्या परीक्षेला बसणार होती. तिच्या बरोबरीच्या कांही मुलींचीं त्या वर्षी लग्नें होऊन गेलीं.

जिव्हाळ्याची अशी तिची एक मैत्रीण होती. तिचें नांव यमुना. ती जातीनें ब्राह्मण होती, देशस्थ ब्राह्मण होती. ती यमुनेच्या घरीं जाई तेव्हां यमुनेची आई आपल्या मुलीवर रागावत असे. असली मुलगी आपल्या घरीं येणें तिला पसंत नव्हतें. तिला प्रश्न पडे, 'असली मुलगी म्हणजे काय ? आईबापांशिवाय तर कोणाचा जन्म होत नाहीं !' यमुनेची आई म्हणे, "तिच्या बापाचा पत्ता कुठं आहे ?" तिनें आपल्या बापाचें नांव सांगितलें. त्याचें नांव होतें शंकरलाल मोतीलाल.

यमुनेची आई म्हणे, "हें झालं गुजरात्याचं नांव. तूं मराठी बोलतेस,

मराठ्यासारखा पोशाख करतेस. तुझी आईसुद्धां मराठी बोलते, क्वचित् कोकणीहि बोलत असेल. तूं नांव लावतेस कवळेकर, अन तुझा बाप म्हणे शंकरलाल मोतीलाल ! कशाला कांहीं ठिकाण नाहीं. आतां तूंच सांग तुझी जात कोण ?'

या अगल्या प्रश्नांमुळेंच ती भेडारून जात असे. ज्याचें नांव ती बापाचें म्हणून सांगत असे, त्या गृहस्थाचा आणि तिचा फारच थोडा परिचय होता. नुसती तोंडओळख होती म्हटलें तरी चालेल. याचेंच तिला वाईट वाटे. तिच्या बरोबरीच्या मुलींचे बाप सदोदित आपल्या मुलींना घरीं दिसत. तिचा बाप नुसता पाहुणा होता.

तिच्या तोंडावर कोणी तिचे उणें उकरून काढीत नसे. यामुळे आपल्या जातीचें व्यंग तिला अजूनपर्यंत कळून आलें नव्हतें. तिला वाटे बाप गुजराती असला म्हणून काय झालें ? गुजराती नवऱ्याची मराठी बायको कां असूं नये ? तिनें केव्हां असें म्हटलें, म्हणजे बाकीच्या मुली तिची टिंगल करीत, पण हें असें कां होतें हें तिचें तिलाच कळत नसे.

यमुनेचें लग्न ठरलें. उरलेली एक मैत्रीण सुद्धां आतां शाळेंतून जाणार याबद्दल तिला फार वाईट वाटलें. आतां आपण तरी कशाला शाळेंत रहायचें, असें तिच्या मनांत आलें.

तिनें आपल्या आईला सांगितलें. आई म्हणाली, "अग लग्नांत काय आहे ? आपला नाहीं का संसार चालला आहे ? संसार थाटायला लग्नच कशाला करायला हवं ?"

"मग काय करायच तर ?" तिनें आपल्या आईला विचारलें.

"आपला कुळधर्म चालवायचा," तिची आई म्हणाली, "हें जसं माझं चाललं आहे, तसंच तुझं चालायचं, पूर्वी कुठं आम्हीं मुलींना शाळेंत घालीत होतों ? आतां शेटलोक विचारतात इंग्रजी येतं का म्हणून, म्हणून तुला शाळेंत घातली. पूर्वी या शेटलोकांना इंग्रजी येत नसे. हल्लीं सारेच इंग्रजी शिकूं लागले आहेत, म्हणून तुला शाळेंत घातली. आतां तुला शाळेंत जायचं नसलं तर मी पुढल्या उद्योगाला लागतें."

तिच्या आईनें एकदांचा सारा बेत जुळवून आणला. सारा 'विधि' झाला. त्या 'विधी'च्या वेळीं ती यमुनेला बोलावणार होती. पण आईनें नकार दिला.

तिला बरें वाटलें नाहीं. यमुनेच्या लग्नाला ती गेली होती, तेथल्या लोकांनी तिला चांगल्या रीतीनें वागवलें नव्हतें. तिला वाटलें होतें, आपल्या लग्नाच्या वेळीं त्यांना बोलावून आपण त्यांना चांगल्या रीतीनें वागवूं आणि अशा रीतीनें त्यांना लाजवूं. पण तें कांहीं झालें नाहीं, याचेंच तिला वाईट वाटलें. यमुनेच्या लग्नाचे जसे कांही सोहाळे झाले होते तसे आपले झाले नाहींत म्हणून सुद्धां तिला वाईट वाटलें. पण तिची आई म्हणाली, "हें मुळीं लग्नच नव्हे, मग तसे सोहाळे कसे होतील?"

तिला प्रश्न पडे, मग हें झालें तरी काय? नुसता पुरुषाशीं संबंध?

तिची आई म्हणाली, "नि यमुनेचं तरी दुसरं काय झालं? तूं म्हणतेस तसले सोपस्कार तुझे झाले नाहींत, यमुनेचे झाले. पण पुढं काय, तेंच ना? पुरुषाशीं संबंध, एवढंच ना? मी म्हणतें, पुरुषाशीं संबंध येण्यासाठीं त्या तसल्या उठाठेवी तरी कशाला?"

तिनें यमुनेला तसें सांगितलें, पण यमुनेनें तिच्या मूर्खपणाबद्दल तिची थट्टाच केली. कांहीं केल्या तिला उमज पडेना.

असेच कांहीं दिवस गेले. यमुनेचा संसार थाटला होता, हिचें हें असें चाललें होतें. यमुना दुसऱ्याच्या घरीं जाऊन राहिली होती, इथें तो दुसरा तिच्या घरीं येत असे, पण रहात नसे. एवढाच काय तो फरक होता, बाकी सारें सारखेंच होतें.

एके दिवशीं यमुना तिला भेटायला आली. यापूर्वी यमुना कधींच तिच्या घरीं आली नव्हती, आग्रह करून सुद्धां आली नव्हती. गेली तर तीच यमुनेकडे जात असे, पण हल्ली तें सुद्धां क्वचितच होत असे, नाहींच म्हटलें तरी चालेल. दोघेंही दुरावल्यासारखीं झालीं होतीं. म्हणूनच यमुना घरीं आल्याचा तिला आनंद झाला.

यमुनेचा चेहरा उतरून गेला होता. ती भेटली पण नित्यासारखी हंसली नाहीं. इकडल्या तिकडल्या गोष्टी निघाल्या, पण बोलण्याला रंग भरत नव्हता. यमुनेनें तिच्या घरीं येण्याचें धैर्य—नव्हे पाप—कां केलें, हें शेवटीं एकदांचें तिनें सांगितलें. ती मोठ्या संकटांत होती. तिचा नवरा एका विमा कंपनींत चांगल्या मोठ्या हुद्यावर नोकरीला होता, त्याच्यावर कांहीतरी किचाट आलें होतें. पैशाची अफरातफर केल्याचा आरोप होता. त्या कंपनीचा जो डायरेक्टर, तोच

तिचा 'हा'. त्या तिच्या 'ह्या'कडून नवऱ्याला सोडवायची कांहीं खटपट करावी म्हणून ती मुद्दाम आली होती. ती म्हणाली, "तुझ्या 'ह्यां'ना सांगून पहा. माझ्या नवऱ्याची अब्रू राखणं त्यांच्या हातीं आहे."

एवढ्या प्रसंगांत असतांना—अगदीं काकुळतीला आली असून सुद्धां—यमुना ज्या भाषेंत बोलत होती, ती भाषा कांहीं तिला आवडली नाहीं. स्वत:बद्दल बोलतांना ती 'माझा नवरा' म्हणत असे, नि तिच्याबद्दल बोलतांना नुसतें तुझा 'हा' असें म्हणत असे. त्या 'हा' म्हणण्यांत जी खोंच होती, जें वैषम्य होतें, तें तिला जाणवल्यावांचून राहिलें नाहीं. तरीही तिनें कबुली दिली.

तिच्या 'ह्या'ला तें कांहीं आवडलें नाहीं. आपल्या व्यवहाराच्या भानगडींत आपल्या 'हीं'नें पडावें असें त्याला वाटत नसे. ती म्हणाली, "यमुनेला संकट वाटतें. तिचा नवरा प्रसंगांत आहे म्हणून तिला संकट वाटतें. तिला जसा तो, तसेच मला तुम्ही. तें संकट निवारण करायचं सामर्थ्य तुमच्या हातीं आहे म्हणून मला अभिमान वाटतो. म्हणूनच मला ही संधि मिळाली याचा आनंद झाला. सारींच मला हिणवतात. मी नुसती 'ही.' कुणावर माझी कांहीं सत्ता नाहीं. नुसती 'ही' असण्यापलीकडे मला कसलाच अधिकार नाहीं असं म्हणतात, तें खोटं पाडलं पाहिजे. मी सुद्धां कांहींतरी अधिकार गाजवूं शकतें, असं सर्वांना पटलं पाहिजे. नवऱ्यासाठीं म्हणून ती माझ्याकडे धांवत आली. आतां मी तिच्यासाठीं तुमच्याकडे धांव घ्यायची नाहीं तर दुसऱ्या कुणाकडे?"

तिचा 'हा' विचारांत पडला. त्याच्या मनाला सुद्धां ती गोष्ट लागून राहिली. त्याला सुद्धां वाटलें, 'ही' म्हणजे अगदीं 'ही'च का? त्याचें सुद्धां लग्न झालें होतें, त्याचीही एक लग्नाची बायको होती, ती त्याच्यावर सत्ता गाजवीत असे. त्याला वाटलें, त्या बायकोनें सांगितलें असतें तर आपण नसतें का ऐकलें? मग हिचें कां ऐकूं नये? तिच्यांत नि हिच्यांत फरक काय? तसें पाहिलें तर लग्नाच्या बायकोपेक्षां हिच्या पायीं त्याचा जास्त खर्च होत होता. ही जरी नुसती 'ही' असली, तरी एक प्रकारें मोलाची होती—बहुमोल बायको होती. अन्नवस्त्रावारी असलेली शेजेची नि पेजेची बायको मोठी, कीं शेंकड्यांनी पैसे टाकून आपलीशी केलेली ही नुसत्या शेजेची बायको मोठी? तो व्यवहारी

माणूस होता. आंकड्यांच्या हिशोबानें तो माणसाची पारख करीत असे. पैशाच्या मोलानें तो माणसाचा तोल घेत असे. त्या पैशाच्या तोलानें लग्नाच्या बायको-पेक्षां हिचें पारडें जड आहे, असें त्याच्या दुकानदारी बुद्धीला वाटलें.

दुसऱ्या दिवशीं तो तिला म्हणाला, "तुझ्या मैत्रिणीसाठीं कांहीं जमलं तर पाहतों. बहुतेक तिच्या नवऱ्याला सोडवतां येणं शक्य आहे."

तिचा आनंद गगनांत मावेना. ती धांवतच यमुनेच्या घरीं गेली. तिचा नवरा त्यावेळीं घरीं नव्हता. यमुनेला तिनें आश्वासन दिलें. यमुनेनें तिला मुद्दाम राहवून घेऊन चहाफराळ देऊन तिचा आदरसत्कार केला.

ती चहा घेत असतांना यमुनेचा नवरा घरीं आला. तिला पाहून दचकून तो एकदम घरांत गेला. यमुना त्याच्या मागोमाग गेली. त्यांचें अर्धवट बोलणें तिच्या कानीं आलें. यमुना त्याला धीर देत होती. तो म्हणत होता, "म्हणतेस म्हणून ऐकतों, पण या रंड्यांच्या शब्दावर विश्वास ठेवावा कुणी?"

बोलत असतांना तो पुन्हा पुन्हा 'रंडी' हा शब्द उच्चारीत होता. त्या शब्दाचा अर्थ तिला माहीत नव्हता. या कामीं ती अगदींच अजाण होती. असले शब्द तिच्या कानीं येऊं नयेत म्हणून तिच्या आईनें खबरदारी घेतली होती, म्हणूनच 'हें असें' झाल्यावर तिला शाळेंतून काढली होती.

यमुना हंसतमुखानें आली, तेव्हां तिचा चेहरा कोमेजलेला होता. तिनें विचारलें, "रंडी म्हणजे काय? कुठल्या रंडीबद्दल बोलत होते ते!"

यमुनेच्या काळजांत चर्र झालें. ती म्हणाली, "त्या शब्दाला कांहीं अर्थ नाहीं. तो कांहीं मराठी शब्द नव्हे."

"पण मलाच उद्देशून ते 'रंडी' म्हणत होते का?" तिनें विचारलें.

"तसं म्हटलं तरी चालेल." यमुना ओशाळून म्हणाली, "लग्न न झालेल्या बाईला तो शब्द लावतात."

"कुठल्याही का?" तिनें विचारलें.

"नाहीं," यमुना म्हणाली, "अशा तुझ्यासारख्या ज्या असतात त्यांना म्हणतात तसं. पण त्याला कांहीं विशेष अर्थ नाहीं, मनांत घेण्याजोगं असं कांही नाहीं त्यांत!" यमुना आपल्यापरीनें तिची समजूत घालायचा प्रयत्न करीत होती.

यमुनेचा नवरा तिच्याशीं कांहीं बोलला नाहीं. तिच्या समोरून निघून गेला, पण तिची ओळख करून घ्यायचा त्यानें प्रयत्न केला नाहीं. तिला राग आला. तिला वाटलें, त्यांना सांगून याला तुरुंगांतच घालावें. पण तिनें आधींच वचन दिलें होतें, त्या वचनाची तिला किंमत होती, तें वचन घ्यानीं घेऊन रोज ती आपल्या 'ह्या'च्या कानींकपाळीं किटकिट लावीत होती.

शेवटीं एके दिवशीं त्यानें तिला सांगितलें, 'यमुनेच्या नवऱ्याला दोषमुक्त करण्यांत आलें.' दुसऱ्या दिवशीं ती पुन्हा यमुनेच्या घरीं गेली. तिच्या घरीं त्या दिवशीं बरीच मंडळी गोळा झाली होती, म्हणून यमुनेनें तिला आंत आपल्या खोलींत नेलें. यमुनेला गहिंवर आला होता. 'तुझ्या कृपेनं आमच्यावरचं संकट टळलं.' असें यमुना म्हणाली, तेव्हा तिला पोट भरल्यासारखें वाटलें.

"आधीं चहा घेऊन ये पाहूं !" बाहेरून हुकूम आला. तिला बसायला सांगून यमुना घाईघाईनें निघून गेली. बाहेरच्या लोकांचें भाषण तिला तिथून ऐकूं येत होतें. आपण कसकसे डाव टाकले, कशा कारवाया केल्या, कशी अक्कल चालवली, तें यमुनेचा नवरा आपल्या मित्रांना खुलवून सांगत होता; पण त्या साऱ्या भाषणांत तिचा उल्लेख आला नाहीं.

एकजण म्हणाला, "अरे ती नायकीण कां आली आहे तुझ्या घरीं ?"

"तिची शाळेंतली मैत्रीण आहे ती. येते अशी केव्हांकेव्हां. नायकीण असली तरी तशी बरी आहे." यमुनेचा नवरा म्हणाला.

"पण तूं गृहस्थ माणूस, आतां तुझ्या बायकोनं हे असले पोरवयांतले संबंध अजून चालू ठेवणं बरं नव्हे." एकजण म्हणत होता. त्याच वेळीं यमुना आंत आली.

"ऐकलंस त्यानं काय म्हटलं तें ?" तिनें यमुनेला विचारलें.

"जाऊं दे." असें म्हणून यमुनेनें चहाचा पेला तिच्यापुढें ठेवला.

"माझ्या '**ह्यां**'नींच तुझ्या नवऱ्याला सोडवलं हें माहीत आहे का त्यांना ?" तिनें विचारलें, "नायकीण म्हणून ते माझी हेटाळणी करताहेत त्याचं तुला कांही वाटत नाहीं का ?"

यमुनेचा चेहरा खाड्कन् उतरला.

"जा जाऊन त्यांना सांग." ती म्हणाली, "बायकांच्या जातीचा कांही अभिमान असला, तर माझ्यावर उडवलेले एवढे शिंतोडे पुसून काढ."

यमुनेचे डोळे भरून आले होते. ती म्हणाली, "पुरुषाची जात ही अशीच कृतघ्न. त्यांना सुद्धां वाटतं, कीं तुझ्या शब्दानं कांही झालं नाहीं."

"तुला वाटतं का तसं?" ती म्हणाली.

एक शब्दसुद्धां न बोलतां तिचा हात धरून तिला घेऊन यमुना बाहेर आली नि म्हणाली, "ही नायकीण नव्हे बरं. ऐकलंत? हिला कुणी वांकडं बोलेल तर तें मी ऐकून घ्यायची नाही. आमच्यावरचं संकट टळलं तें हिच्यामुळं. हिचे 'हे', तेच यांचे डायरेक्टर. त्यांनीं बचावलं यांना."

सगळे 'हो: हो:' करीत हंसत सुटले. यमुनेचा नवरा सुद्धां हंसत होता. एकजण म्हणाला, "रंडीच्या वशिल्यानं बचावलास अं लेका!"

"कोण म्हणतो असं?" यमुनेचा नवरा म्हणाला, "माझ्या अक्कलहुषारीनं माझा बचाव केला."

"मग कां आलांत माझ्या काकलुतीला?" यमुना म्हणाली, "कां मला पाठवलंत हिच्याकडे? तुमचे डायरेक्टर देखील असंच म्हणाले ना? तुम्हाला बाजूला घेऊन ते असं म्हणाले, असं तुम्हींच ना मला सांगितलं? मग आतां कां खोटं बोलतां?"

सारे मोठमोठ्यानें हंसत सुटले.

"आतां ही बघा लग्नाची बायको!" एकजण तोंड वेंगाडीत म्हणाला, "बायका तेवढ्या साऱ्या सारख्याच, मग त्या लग्नाच्या असोत कीं ठेवलेल्या असोत."

तिरमिरीसरशी ती यमुनेचा हात सोडून निघून गेली. झालेली गोष्ट आपल्या 'ह्या' ला सांगावी असें तिला वाटत होतें, पण यमुनेकडे पाहून तिनें आपला संताप गिळून टाकला.

* * * *

दुसऱ्या दिवशीं यमुना तिला भेटायला आली. तिच्या नवऱ्यानें तिला घरांतून घालवून दिलें होतें.

"पाहिलंस?" यमुना म्हणाली, "हें असं आहे. कसलं हें लग्न? त्यापेक्षां तूंच सुखी. उद्यां त्याला घालवून द्यायचं म्हटलं तर तें तुला शक्य आहे. मी ही अशी उघडी पडलें, पण मला कांही करतां येत नाहीं!"

तिचें हृदय आनंदानें भरून आलें.

# देव कीं माणूस

मुलीला तेरावं वर्ष लागलं आणि ती लग्नाशिवाय राहिली तर आईबापांच्या जिवाला घोर लागण्याचा तो काल होता.

पहिलीच मुलगी—तिचं लग्न मोठं थाटांत करायचं असा बेत — पण ते सारे बेत बेतांत राहिले होते. पंचवीस रुपये पगारांत चार माणसांचा संसार चालवून मुलीच्या लग्नाच्या खर्चाला पैसे आणायचे कुठून याची पांडोबांना चिंता लागली होती.

आज पंचवीस रुपये पगार म्हणजे त्याची किंमत वाटत नाहीं. पण लढाईच्या पूर्वी पंचवीस रुपयांत पांचसहा माणसांच्या कुटुंबांचे संसार चालत असत.

स्थळ मोठं चांगलं आढळलं होतं. मुलगा हायर—लोअरची परीक्षा पास झालेला होता—उद्यां पहातां पहातां मामलेदार होणार होता.

स्थळ हातचं जाईल म्हणून पांडोबांचा जीव खालीं वर होत होता. मुलाच्या बापानं अडवून धरलं होतं. पांचशें रुपयांखालीं हुंडा घ्यायचा नाहीं असं त्यानं निक्षून सांगितलं होतं. शिवाय लग्नाला खर्च लागायचा तो वेगळाच.

पोष्ट खात्यांत पांडोबाची नोकरी तेरा वर्षं झाली होती. पहिल्यानं वडील हयात होते त्यावेळीं पगार पंधरा होता खरा. पण त्यांतलेच चार दोन रुपये ते शिलकीला टाकीत असत. पोस्टाच्या सेव्हिंग बँकेंत त्यांनीं जिवाभावाला म्हणून चारशें रुपये संग्रहीं टाकले होते.

दीड दोनशे रुपये आपल्या बापाकडून आणीन असं त्यांची बायको म्हणत होती. तरी देखील दोन अडीचशें रुपये आणखी असल्याशिवाय उरकलं नसतं.

जिवाचा धडा करून पांडोबांनीं लग्नाचा ठराव तर केलाच. पांचशें रुपये नवऱ्या मुलाच्या पदरांत ओतले. त्यांच्या बायकोनंही माहेराहून आपल्या अंदाजाप्रमाणं दीडदोनशें रुपये आणले.

लग्न शक्य तितक्या थाटांत झालं. गावांत पांडोबा सर्वांचे आवडते असल्यामुळं सर्वत्रांनीं आपापल्या परीनं मदत करून कार्य साजरं केलं. पांडोबाच्या बायकोचा जीव खालीं पडला.

लग्न झाल्यापासून पांडोबा मात्र अगदीं बेचैन झाले होते. रखमाबाई मोठ्या खुषींत होत्या, त्यामुळं पांडोबांची ही मनःस्थिति त्यांच्या लक्षांत आली नाहीं. पुरेसे पैसे हातीं नव्हते हें तिला माहीत होतं. पण त्यांनीं बाकीची भरपाई कुठून केली हें विचारायचा तिला धीर होत नव्हता.

तिला वाटलं, गांवांत एवढी ओळख, कुणाचे तरी कर्जाऊ काढले असतील !

आणि वस्तुस्थिति तशीच होती. आपल्या मनाप्रमाणें पांडोबांनीं हे पैसे कर्जाऊच काढले होते. या कर्जाला व्याज पडणार नव्हतं. पण त्याची भरपाई कशी करायची याचीच त्यांना मोठी काळजी पडली होती. आजवर ज्या काटकसरीनं संग्रह केला ती काटकसर होणं आजच्या वाढत्या प्रपंचांत शक्य नव्हतं.

* * * *

पांडोबा ज्या पोस्टांत पोस्टमास्तर होते तें लहानशा तालुक्याचं पोस्ट ऑफिस होतं. पोस्टमास्तर तेच, कारकून तेच आणि तारमास्तरही तेच. तिन्ही कामं एकट्यालाच करावीं लागत होतीं.

आणि हीं तिन्ही कामं एकट्यालाच करावीं लागत होतीं म्हणूनच कर्ज काढणं शक्य झालं होतं. सरकारी तिजोरींतले अडीचशें रुपये त्यांनीं वापरले होते.

एकाच व्यक्तीला ही हकिकत माहित होती. ती व्यक्ति म्हणजे त्यांचा पॅकर भिकू. भिकूची पांडोबावर मोठी श्रद्धा होती. सरकारी तिजोरीच्या किल्ल्या भिकूच्या हातीं असत. पैसे हाताळण्याचा पांडोबांना मोठा तिटकारा होता म्हणून ते या कामीं सर्वस्वी भिकूवर अवलंबून राहात असत.

आणि म्हणूनच ही गोष्ट भिकूला सांगितल्याखेरीज गत्यंतर नव्हतं.

आंकडेशास्त्रांत पांडोबा मोठे प्रवीण होते. कांहीं ना कांहीं लायबिलिटीज दाखवून तेवढी रक्कम तिजोरींत राहाण्याची ते खबरदारी घेत. रोजचा आंकडा

जुळवतांना भिकूसुद्धां हातचे अडीचशें धरून त्यांना आंकडा सांगत असे.

दर सहा महिन्यांनीं पोस्टाच्या तपासणीसाठीं सुपरिंटेंडेंट आले तर कांहीं तरी सबब सांगून तेवढ्या दोन तीन दिवसांपुरती तेवढी रक्कम कुणातरी व्यापाऱ्याकडून आणून ते प्रसंग निभावून नेत असत.

त्यांचं गांव दोन तार ऑफिसांच्या मध्यावर होतं. कुठल्याही बाजूनं साहेब येत असले तर त्या बाजूच्या तार ऑफिसकडून त्यांना बातमी मिळे आणि मग ते रकमेची भरपाई करून ठेवीत.

पण त्यांना हा एक हृद्रोग झाला होता. प्रकरण उघडकीला आलं तर हातकड्या पडण्यापलिकडे दुसरा उपायच नव्हता.

अडीचशें रुपये मिळवण्यासाठीं त्यांनीं आपल्यापरीनं जंगजंग पछाडले. पण कांहीं उपयोग झाला नाहीं. बायकोच्या अंगावर जे कांहीं दागिने होते ते सगळे विकले असते तरीसुद्धां या रकमेची भरपाई झाली नसती. एवढी रक्कम वचनचिठ्ठीवर मिळवणं त्या काळांत शक्य नव्हतं.

आणि आजच्या काळांत तरी काय होणार होतं ? तारण असल्याशिवाय पैसे कर्जाऊ देतो कोण ? कर्जाऊ काढले तर व्याज कुठलं भरायचं ?

पांडोबांची प्रकृति थकत चालली होती. आजारी पडण्याचं त्यांना भय वाटत नव्हतं तें शारीरिक दुःखापुरतं—पण त्यांना वाटे, चट्कन् एकाद्या दिवशीं आजारी पडलों आणि ऑफिसचा चार्ज द्यायचा प्रसंग आला तर काय करायचं ? एवढी रक्कम कुठून आणायची ?

या भीतीमुळंच त्यांनीं मन घट्ट केलं होतं. काळजीनं प्रकृति थकत चालली होती, तरीही मनाच्या जोरावर ते हिंडतेफिरते राहिले होते. डॉक्टरला प्रकृति दाखवावी, असं रखमाबाई रोज म्हणत. पण ते नुसतं हंसण्यावारी नेत. ते म्हणत, "काय होतंय मला ? उगीच तुला आपला संशय ! चांगला हिंडतोंफिरतोंय–रोज पंधरा तास ऑफिसांत काम करतोंय—आणि तूं म्हणतेस माझी प्रकृति बरी नाहीं ! म्हणून तुझेच डोळे तपासून घेतले पाहिजे आधीं !—" अंतरांतल्या वेदना दाबून ते अशा रीतीनें रखमाबाईची समजूत घालीत.

पण रखमाबाईचं समाधान होत नव्हतं. महिनाभर रजा घेऊन गांवीं जावं म्हणून ती सारखी हट्ट धरून बसली.

पण रजा घेणं पांडोबांना शक्य नव्हतं. त्यांनाही वाटे, कीं रजा घेतल्याशिवाय आपली प्रकृति सांवरणार नाहीं. पण रजा घ्यायची कशी? रजा घ्यायची म्हणजे दुसऱ्याला चार्ज द्यायचा—आणि चार्ज द्यायचा म्हणजे रकमेची भरपाई करायची—ती कशी करायची?

* * * *

मनाचा जोर मोठा विलक्षण असतो. थकलेल्या स्नायूंना सुद्धां मनाच्या जोरानं बळकटी येते. मरायला टेकलेल्या एका कंजूष माणसानं आपला मुलगा आपण मेल्यानंतर आपली राखीव दौलत उधळील या भीतीनं 'कसा मरतों तें पहातों!' असं म्हणून यमाची चिठ्ठी फिरवली अशी आख्यायिका पांडोबांनीं ऐकली होती. पूर्वी त्यांना ती खरी वाटत नव्हती. पण आतां अनुभवानं वाटलं, मनाच्या जोरावर मृत्युदेखील टाळतां येईल.

पण पांडोबांना एकच संकट पडलं होतं तें हेंच, कीं नुसत्या मनाच्या जोरावर पैसे मिळवतां येत नाहींत! मृत्यु टाळण्यापेक्षां देखील पैसे मिळवणं कठीण का?

दिवसेंदिवस त्यांना आपल्या प्रकृतीची काळजी वाटत होती–पण प्रसंग वेगळाच आला. रखमाबाई आजारी पडली.

पुन: पांडोबांना धास्ती पडली, तिच्या आजारापायीं रजा घ्यायचा प्रसंग तर येणार नाहीं ना?

हृद्रोग चोहीं बाजूंनीं वाढत होता. पण त्याला कांहीं उपाय नव्हता. सरकारी तिजोरींतले अडीचशें रुपये वापरून ते त्यांनीं दोन वर्षं पचवले होते. चार तपासण्या निभावल्यामुळं त्यांना बराच आत्मविश्वास उत्पन्न झाला होता. तपासणीला येणाऱ्या साहेबांची वर्दी आधीं मिळण्याची खात्री असल्यामुळं त्यांना बरीच निश्चिती वाटत होती.

पण दुर्दैव कसं चालून येतं तें सांगतां येत नाहीं.

एके दिवशीं सकाळचं टपाल पुढं पाठवून प्रातर्विधि उरकून गांवच्या चार मित्रांबरोबर ते गप्पा मारीत बसले असतां एकदम साहेबांचा पट्टेवाला दारांत दिसला. तो म्हणाला, "साहेब आले!"

किरकोळ रजेवर गेलेले साहेब नित्याच्या अनुक्रमानं ऑफिसं तपासींत न येतां सहज एकदम त्या गांवीं आले होते.

हें असं कसं झालं, याचा विचार करायला अवधि नव्हता. मित्रमंडळीला घाईघाईनें मागील दारानं घालवून ते पुनः बाहेर येतात तों साहेबांची स्वारी ऑफिसांत आलेली.

पोस्ट खात्याचा एक असा नियम आहे कीं, पोष्टाची तपासणी करणाऱ्या अधिकाऱ्यानं गांवीं येतांच आधीं पोस्टांत येऊन शिल्लक तपासायची आणि मग आपल्या मुक्कामावर जायचं. आणि त्याच नियमाला अनुसरून साहेब तडक पोस्टांत आले होते.

पांडोबा अगदीं सुन्न झाले होते. पुढल्या भवितव्याचा चित्रपट त्यांच्या डोळ्यांसमोर भराभर निघून जात होता. शिलकींतली तूट नजरेला येतांच आपल्याला पकडून पोलीसच्या ताब्यांत दिला आहे, आपल्या हातांत हातकड्या पडल्या आहेत, पोलिस आपल्याला पकडून बाहेर नेत असतां एक मोठा हंबरडा फोडून आजारी असलेल्या रखमाबाईचा प्राण निघून गेला आहे—अशीं अभद्र आणि भयानक दृश्यं त्यांच्या नजरेसमोरून निघून जात होतीं आणि त्याचवेळीं ते शिलकीचा आंकडा बेरीज वजाबाकी करून काढीत होते.

सारं कांहीं मनाच्या जोरावर चाललं होतं. त्यांची जीभ कोरडी पडली होती. रक्त गोठून गेलं होतं. सर्वांग बधिर झालं होतं. पण अत्यंत शान्तपणानं त्यांची आंकडेमोड सुरू होती.

भिकू पॅकर पुनः पुन्हां त्यांच्या जवळ येऊन खुणावीत होता.

तसतसं त्यांचं रक्त अधिकाधिक गोठून जात होतं. आंकडा तयार झाला, साहेबांनीं तपासून पाहिला आणि ते तिजोरीजवळ आले.

पांडोबांनीं मनाचा निर्धार केला होता. एकदां त्यांना वाटलं, तिजोरी उघडण्यापूर्वींच आपला गुन्हा कबूल करावा–आपण अडीचशें रुपये वापरले आहेत असं सरळ सांगावं !—

पण मनाचा आणि देहाचा संबंध सुटला होता. 'पांडोबां'चं मन भलतीकडे भिरभिरत होतं आणि 'पोस्टमास्तर'चा देह आपलीं कामं बिनचूकपणं अगदीं यंत्रासारखीं करीत होता.

तिजोरी उघडून त्यांनीं रक्कम बाहेर काढली. कागदांत गुंडाळलेल्या रुपयांच्या चळथी सोडून रुपये मोजून ते जसजसे साहेबांपुढं ठेवूं लागले तसतशी त्यांच्या काळजांतली धडकी अनावर वाढूं लागली. कानाजवळ नगारा वाजतो आहे असं त्यांना वाटलं. सर्व कांहीं त्यांना दिसत होतं. पण डोळयापुढं अंधेरी आली होती.

तपासणीखेरीज ते पैशांना कधींच शिवत नसत, त्यामुळं रकमेच्या चळथींची त्यांना दाद नसे.

एक वेळ चळथ उघडून पंचविसांची बिट्टी लावून समोर ठेवायची एवढीच जाणीव त्यांना होती. त्या बिट्ट्या किती झाल्या हें देखील त्यांना कळत नव्हतं. यंत्रासारखी त्यांची हालचाल सुरू होती. रक्कम किती झाली याची त्यांनीं मुळींच कदर केली नाहीं. रुपया मागून रुपये, अधेल्या, पावल्या, चवल्या, पैसे आणि पया मोजून ते साहेबांच्या समोर ठेवीत होते.

तिजोरींतील रक्कम संपली. आतां पांडोबांना एकच दिसत होतं—आपल्या हातांत हातकड्या पडणार.

पण 'Alright' म्हणून साहेब जायला निघाले त्या वेळीं ते भानावर आले. तरीही त्या रकमेच्या आंकड्याकडे त्यांच्यानं पहावेना. दारापर्यंत जाऊन त्यांनीं साहेबांना मार्गस्थ केलं.

ते परत फिरतांच भिकू पॅकर म्हणाला, "उगीच घाबरलां तुम्ही मास्तर."

"काय झालं?" पांडोबा म्हणाले, "आंकडा जुळला? रक्कम जुळली?"

भिकूला हंसू आल्यावांचून राहिलं नाहीं.

तिजोरीजवळ येऊन पांडोबांनीं रक्कम मोजली—आंकडा पाहिला. दोन्ही आंकडे तंतोतंत जुळते आहेत असें पाहून डोळे तारवटून ते भिकूच्या तोंडाकडे नुसतं पहातच राहिले.

त्यांना दामाजीपंताची आठवण झाली—देव मामलेदारांची आठवण झाली. त्यांच्या तिजोरीतींल तुटीची भरपाई देवानं अशीच केली होती.

तसंच का हें झालं? तेवढे का आपण पुण्यवान् आहोंत? तशीच का आपली हांक देवाच्या कानीं पोचली?

पांडोबांची मुद्रा पाहून भिकूला हंसूं आवरेना.

× × × ×

"हंसतोस काय ?" पांडोबा रागावून म्हणाले, "आंकडा जुळला कसा ?"

"मी खूण नव्हतों कां करीत ? "भिकू म्हणाला, "कीं सगळं कांहीं ठाकठीक आहे म्हणून !"

"तें कसं काय ?" पांडोबांनीं विचारलें.

"आपण तेव्हां शौचाला गेलां होतां." भिकू म्हणाला, "सुंदरदास शेटला मुंबईला इन्शुअर करुन पाठवायला नोटा पाहिजे होत्या म्हणून तो अडीचशें रुपये घेऊन आला होता. तुम्ही इथं नव्हतां म्हणून मी ते तिजोरींत ठेवून दिले. मग येऊन नोटा घेऊन जायला मीं त्यांना सांगितलं. पण ते घाईत होते.—"

"अडीचशें रुपये !" पांडोबा म्हणाले. अडीशेंच रुपयेच कां आणले सुंदरदास भाईनं ? दोनशें कां आणले नाहींत ? तीनशें कां आणले नाहींत ? त्यांना या प्रश्नाचा उलगडा होईना. अशीच का दामाजीची रसद भरली ? अशीच का भोसेकर देव मामलेदारांची तिजोरीची रक्कम पुरी केली ? देव संकटाला धांवून येतो असं म्हणतात तें यालाच का ?

संकट टळलं होतं. पण त्यांच्या मनाला स्वस्थता वाटत नव्हती. त्यांना प्रश्न पडत होता तो हाच, कीं संकटाला येतं कोण ? देव कीं माणूस ? इथं सुंदरदास जो आला होता त्याच्या कानांत सांगायला देव कुठं गेला होता ? तो आपल्या कामासाठीं आला होता—पांडोबांना संकटांतून सोडवायला अडीचशें रुपये घेऊन आला नव्हता. त्याला नोटा हव्या होत्या म्हणून त्यानं अडीचशें रुपये आणले होते. मग या संकटांतून सोडवलं कुणी ? देवानं कीं माणसानं ?

देवानं कीं माणसानं ?

भिकू पॅकर म्हणाला, "देवानं बुद्धि दिली सुंदरभाईला !"

पण त्या उत्तरानं पांडोबांचं समाधान झालं नाहीं. त्यांना वाटलं, संकटाला धांवून येतो तो माणूस—देव नव्हे !

# पहिला मर्द

त्या दिवशीं आमच्या कॉलेजांत मोठी खळबळ उडाली होती. प्रत्येकजण कुणाला तरी बाजूला घेऊन कुजबुजत होता.

प्रत्येकाला प्रश्न पडला होता तो हाच, कीं ही गोष्ट लिहिली कुणी? गोष्ट अगदीं उघडउघड होती. नलिनीचें चरित्र तींत स्पष्टपणें दिग्दर्शित केलें होतें.

त्या चरित्रांत नांव ठेवण्याजोगें असें विशेष कांहीं नव्हतें खरें, पण नलिनीच्या तें मनाला लागलें होतें. गोष्टी दारिद्र्याच्या होत्या. त्या दारिद्र्याच्या पायीं नलिनीला मोठे कष्ट सोसावे लागले होते,—यातना सोसाव्या लागल्या होत्या.

ती हकिकत फारच थोड्यांना माहीत होती. आणि ज्या दोन तीन माणसांना ती माहीत होती, त्या मुलीच होत्या आणि त्यांची नलिनीबद्दल सहानुभूति होती.

नीति–अनीतीचा प्रश्न जरी या गोष्टींतून आला नव्हता, तरीही आपल्या परिस्थितीची चर्चा सार्वजनिकरीत्या झालेली नलिनीला आवडली नाहीं.

आणि चूक झाली होती ती तिचीच. ती गोष्ट प्रसिद्ध झाल्याबरोबर उद्वेगाच्या भरांत चारचौघांत ती उद्‌गारली, "ही माझी खित्तंबातमी कुणी सांगितली या लेखकाला?"

तोंडांतून शब्द निघून गेल्यानंतर ती सावध झाली. पण हातचा बाण निघून गेला होता. चार दोन परक्या माणसांच्या कानीं तो उद्‌गार जातांच हां हां म्हणतां ती बातमी कॉलेजभर पसरली. जो तो धागेदोरे शोधून काढण्याचा प्रयत्न करूं लागला. साध्या गोष्टीचा विपर्यास करून गर्भितार्थ अंदाजायचा प्रयत्न होऊं लागला.

दारिद्र्याच्या परिस्थितींतून उत्पन्न होणाऱ्या प्रसंगांवर अनीतीचे आरोप होत आहेत असें ज्यावेळीं नलिनीला कळून आलें त्यावेळीं ती अस्वस्थ झाली. पुरुष विद्यार्थ्यांत ती फारशी मिसळत नसे—फारशी का, कुणाही पुरुष विद्यार्थ्याबरोबर ती तसेंच काम असल्याशिवाय बोलतसुद्धां नसे. आणि याच तिच्या स्वभावदोषामुळें ती पुरुष विद्यार्थ्यांत अप्रिय झाली होती.

ती जशी बुद्धिमान होती तशीच देखणीही होती. तिचा परिचय व्हावा म्हणून प्रत्येक विद्यार्थी धडपडत असे. तिचा स्वभाव तुसडा नव्हता किंवा घमेंडखोरही नव्हता. पण सुंदर मुलीच्या सभोंवार घोंटाळणाऱ्या लाळघोट्या विद्यार्थ्यांच्या कारवायांना ती कधींच बळी पडली नाहीं. कॉलेजांत असे विद्यार्थीही फारसे नव्हते. जे दोघेतिघे होते तेही इतर विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें अप्रिय होऊन बसलेले होते.

याच माणसांपैकीं कुणी तरी ही गोष्ट लिहिली असावी असा तिचा कयास होता. पण प्रश्न होता तो हाच, कीं ही आपली घरची हकिकत या कुणाला कळली कशी?

तिचा अंदाज खरा ठरला. सुनंदेनें कबूल केलें. बुद्धिपुरस्सर तिनें कांहीं सांगितलें नव्हतें खरें. पण एकेदिवशीं या लोकांनीं तिला गांठून एका हॉटेलांत नेलें होतें आणि युक्तियुक्तीनें तिच्याकडून सारी हकिकत काढून घेतली होती.

या कंपूंत देवीदास अग्रणी होता. तो एक लेखक होता. कॉलेजच्या मासिक पुस्तकाप्रमाणें बाहेरच्या मासिकांत आणि वर्तमानपत्रांत तो गोष्टी आणि लेख लिहीत असे. लेखक या नात्यानें त्याला थोडासा लौकिकही मिळाला होता.

तसें पाहिलें तर आधुनिक लेखनाची कला त्यानें चांगली हस्तगत केली होती—आणि आधुनिक लेखन म्हणजे कुत्सा! बहुधा त्याच्या लेखनांत कुणाच्या ना कुणाच्या तरी खाजगी गोष्टी बाहेर काढून चवाठ्यावर मांडलेल्या असत. आणि त्यामुळें तो लोकप्रिय लेखक ठरला होता.

एव्हढा धागादोरा मिळतांच नलिनीला चेव आला. तिनें या बाबतींत आपल्या कॉलेजच्या प्रिन्सिपॉलचा सल्ला घेतला. त्यांनीं सरळ सरळ सांगितलें, "ही तुमची खाजगी बाब आहे. असल्या कामीं हात घालण्याची जबाबदारी प्रिन्सिपॉलनें घेणें योग्य नाहीं. त्यांतूनही या गोष्टींत बदनामीकारक असं कांहीं

नाहीं. तसं कांहीं असतं तर विचार करतां आला असता. शिवाय जें कांहीं झालं आहे तें आमच्या कॉलेजच्या हद्दीबाहेर झालं आहे. कॉलेजच्या मासिकांत असा कांहीं लेख आला असता तर असा कांहीं विचार करतां आला असता. मला वाटतं या प्रकरणीं स्वस्थ बसावं हें खरं."

"अन् मी कोर्टांत गेलें तर?" नलिनीनें विचारलें.

"मला वाटतं तसंही करूं नये." प्रिन्सिपॉल म्हणाले, "कोर्टांत जाण्याजोगं कारण या लेखांत नाहीं--"

"तें कोर्टानं ठरवायचं आहे." नलिनी म्हणाली.

"तें खरं आहे!" प्रिन्सिपॉल उद्गारले, "पण या लेखांत बदनामी शाबीत होणार नाहीं अशी माझी खात्री आहे."

"पण नुसतं त्याला कोर्टांत खेंचून अद्दल घडवायची." नलिनी म्हणाली, "एव्हढ्यासाठींच खटला भरला तर?"

"तेंही मला पसंत नाहीं." प्रिन्सिपॉलनीं सांगितलें, "त्यामुळें उगीच कॉलेजच्या नांवाला काळिमा येईल. मी कांहीं परवानगी देणार नाहीं. यापुढं तुमच्या तुम्ही मुखत्यार राहाल."

नलिनीची निराशा झाली.

तरीही तिचा अंतरात्मा सळसळत होता. कांहीं तरी शिक्षा झाल्याशिवाय या माणसाला सुटून जाऊं देणं बरं नव्हे असें तिला वाटत होतें. कोर्टांत जाऊन बदनामीचा खटला भरण्याची तरी तिची ताकत कुठें होती? आपल्याला झालेला उद्वेग प्रिन्सिपॉलच्या नजरेला यावा एवढ्याच उद्देशानें तिनें तसें विचारले होतें.

नलिनी प्रिन्सिपॉलला भेटल्याची हकिकत कॉलेजांत फैलावली. त्याच प्रकरणाची जिकडेतिकडे चर्चा होऊं लागली.

या प्रकरणीं कॉलेजांत दोन तट पडले होते–किंबहुना तीन होते म्हटलें तरी चालेल. एक नलिनीच्या बाजूचा, एक देवीदासचा अभिमानी—आणि तिसरा प्रिन्सिपॉलसारखाच तटस्थ तट.

या तिसऱ्या तटाचें म्हणणें असें होतें, कीं हें असेंच चालायचें. यांत कांहीं भानगडी होणें इष्ट नाहीं. मेघःशाम या गटाचा पुढारी होता.

त्यानें स्वत: जाऊन नलिनीची समजूत घालण्याचा प्रयत्न केला.

दुसरा कुणी असता तर नलिनीनें बोलूं सुद्धां दिलें नसतें, पण मेघःशाम हा कॉलेजांतला एक अत्यंत निरुपद्रवी प्राणी म्हणून समजला जात होता. तो फार अभ्यासू होता. सहसा इतर मुलांत मिसळत नव्हता. स्पोर्टस, वक्तृत्वोत्तेजक सभा वगैरे गोष्टींत सुद्धां तो भाग घेत नव्हता. अभ्यासापलीकडे त्याला कांहीं दिसत नसे. म्हणूनच तो प्रत्येक वर्षी फर्स्टक्लास फर्स्ट येत होता.

इतर विद्यार्थी त्याला 'मेंढा' म्हणत असत. त्याचे केंस मेंढ्याच्या लोकरी-सारखे होते हें जरी एक कारण असलें तरी त्याच्या स्वभावाला अनुसरूनच त्याला हें नांव देण्यांत आलें होतें. इतर वेळीं अगदीं निरुपद्रवी, पण टकरीच्या वेळीं धडक मारणाऱ्या मेंढ्यासारखीच त्याची अभ्यासांतली धडाडीच या नांवाला कारणीभूत झाली होती.

सुनंदा म्हणाली, "शिष्टाईला मेंढा येतोय हें ध्यानांत घेऊन आपल्याला चालल पाहिजे. तसंच कांहीं असल्याशिवाय तो असल्या भानगडींत पडायचा नाहीं."

सुनंदेची आणि नलिनीची दाट मैत्री होती. आणि देवीदासकडे बोलली होती तीच. तेव्हां या प्रकरणीं तिचाही हितसंबंध होता.

साऱ्या मुलींच्या घोळक्यासमोर यावें लागल्याचें पाहून बिचारा 'मेंढा' अगदीं मलूल पडला होता. जिवाचा धडा करून त्यानें बोलायला सुरवात केली, तो म्हणाला, "आजवर मी कुठल्याच भानगडींत कधीं पडलों नाहीं. पण कॉलेजच्या इभ्रतीसाठीं मला या कामीं तोंड घालावं लागत आहे. आधींच देवीदास हा गुन्हा नाकबूल करतोय. पण मला वाटतं हें त्याचंच काम. तरीही मी म्हणतों, कीं फिर्यादीआर्यादीच्या भानगडींत तुम्ही पडूं नये अशी माझी विनंति आहे–" तो पुढें कांहीं बोलणार होता पण त्याला पुढें शब्द आठवेनात. तो अगदीं अस्वस्थ झाला आणि मनाचा निर्धार करून म्हणाला, "एव्हढं सांगून मी माझं भाषण पुरें करतों."

"छान केलंत," सुनंदा म्हणाली, "आपलं भाषण फार उत्तम झालं. पण तें फार लहान झालं. असल्या महत्वाच्या विषयावर निदान एक तासभर तरी बोललं पाहिजे होतं. प्रत्येक कॉलेजांतून मुलींची कुटाळकी करण्याचं वेड हल्लीं फैलावत चाललं आहे. त्याला आळा घालायचा असं आम्ही सर्वांनीं ठरवलंय. आम्ही कोर्टात जाणार नाहीं–फिर्याद करणार नाहीं–कीं पुनः लाचारीला येऊन

प्रिन्सिपॉलसाहेबांसारख्या शिळपट माणसाकडे याचनाही करणार नाहीं. जें कांहीं करायचं तें आमचं आम्ही करूं. समजलं? जा आतां."

घाबरलेला मेघःशाम आणखी कांहीं न बोलतां निघून गेला. आपण उगीच या भानगडींत पडलो असें त्याला वाटूं लागलें.

त्याच्या मनांत एक प्रश्न उभा राहिला तो असा, 'आमच्या आम्हीं काय तें करूं' असें जें या मुली म्हणतात, त्या काय करणार आहेत? देवीदासला मार-बिरणार तर नाहींत?

त्याच्या मनांत हा प्रश्न यायला आणि तिकडे कॉलेजच्या कंपौंडांत आरडा-ओरड व्हायला एकच गांठ पडली.

तो धावतच गेला. बऱ्याचशा मुलींनीं रस्त्यावरून जाणाऱ्या देवीदासाला घेरून धरलें होतें. मेघःशाम आलेला पहातांच त्या 'मेंढा आला, मेंढा आला' म्हणून ओरडल्या. नलिनी म्हणाली, "सोडा ग वाट. आपल्याला कुणीतरी साक्षीदार पाहिजे. या मेंढे भाऊजी—"

घाबरत घाबरत, इच्छा नसतांही तो त्या घोळक्यांत शिरला. देवीदासच्या मुद्रेवर सुन्नपणाची छाया आली होती. तो निर्धार होता, भीती होती, कीं गर्भगळितपणा होता, याचा अंदाज मेघःशामला येईना.

"आतां असें पहा देवीदास," नलिनी देवीदासच्या समोर येऊन एखाद्या पोलीस शिपायाचा आव आणून म्हणाली, "हा लेख कुणी लिहिला?"

"मला काय माहीत!" देवीदास बोलून गेला.

"हा लेख तुम्ही लिहिला आहे."

"असेलही कदाचित्!" त्यानें धिटाईनें उत्तर दिलें.

"असेल नको," सुनंदा म्हणाली, "आम्हाला तुमचं निश्चित उत्तर पाहिजे. होय म्हणा किंवा नाहीं म्हणा. ही हकीकत मी तुम्हाला सांगितली होती; नव्हे तुम्ही ती माझ्याकडून काढून घेतली. म्हणूनच मी म्हणतें कीं हा लेख तुम्ही लिहिलाय."

देवीदास उगीच राहिला असें पाहून नलिनी म्हणाली, "मर्दासारखे मर्द तुम्ही, होय म्हणायला कां भितां?"

"हो हो, मीच लिहिलाय." देवीदास ठासून म्हणाला, "मग?"

"असा त्रागा करून उत्तर नको मला" नलिनी म्हणाली, "हे मेंढेभाऊजी इथं साक्ष आहेत. त्यांच्या समोर सांगा. होय असलं तर होय म्हणा, नाहीं तर नाहीं म्हणा. अन् आतां ऐका मेंढेभाऊजी."

"तो मेंढा कशाला हवाय्?" देवीदास म्हणाला. "त्याला काय कळतं यांत? कुणाला डरत नाहीं मी. मी–मीच लिहिलाय तो लेख. या–या हातानं लिहिलाय. आतां झालं?"

"नाहीं!" नलिनी हंसत म्हणाली.

ताडकन् आवाज झाला. तिनें केव्हां आपल्या पायांतली चप्पल काढली हें मेघःशामला दिसलें सुद्धां नाहीं.

"काय केलंत हें?" मेघःशाम ओरडला.

"अरे जा जा." देवीदास म्हणाला, "कळली यांची हिंमत! पोरी आहेत म्हणून! नाहीं तर—" असें म्हणून तो तिथून तडक निघून गेला. "वारे मर्द! वारे मर्द" असें साऱ्या मुली ओरडत होत्या.

"अन् हा मेंढासुद्धां नुसता पहात उभा राहिला." एक थिट्टकली मुलगी म्हणाली. मेघःशाम मान खालीं घालून तिथून निघून गेला.

या प्रकरणाचा बोभाटा होऊं नये म्हणून प्रिन्सिपॉलसाहेबांनीं नलिनी आणि देवीदास यांच्याकडून लेखी माफी घेऊन मिटवामिटव केली.

पण मेघःशामचा जीव राहीना. तो प्रकार त्याच्या मनांत सारखा सलत होता. 'पोरी आहेत म्हणून. नाहींतर—' असें देवीदास म्हणाल्याचें त्याला पुनः पुनः आठवत होतें. 'नाहीं तर—' म्हणजे काय? नाहीं तर त्यानें काय केलें असतें? हाच कुणी पुरुष विद्यार्थी असता तर देवीदासनें आपली वहाण काढून त्याला मारलें असतें का?

देवीदासला विचारावें असें त्याला एकदां वाटलें. पण त्याला खात्री होती, कीं सरळ उत्तर न देतां देवीदासनें त्याचीच थट्टा केली असती.

नलिनीनें चप्पल मारल्याबद्दल देवीदासला कांहींच वाटत नव्हतें. उलट तो म्हणे, "कुणाकडे ढुंकूनसुद्धां न पहाणारी ही नलिनी—चप्पल मारण्यासाठीं तरी बोलली माझ्याबरोबर?"

देवीदासच्या या उद्‌गाराची मेघःशामला शिसारी आली. चप्पल मारल्या

बद्दल जर अभिमान वाटावयाचा तर 'पोरी आहेत म्हणून, नाहीं तर' कशाला म्हणाला? त्याला वाटलें, कु ी मुलगा असता तरी देखील त्यानें तसेंच केलें असतें. बेट्याचा कणाच मोडका! बुद्धिपुरस्सर कुणाची तरी कुचाळी करावी म्हणून लेख लिहिला —सरळ होय म्हणायचा सुद्धां मर्दपणा नाहीं—हडसून खडसून विचारल्यावर त्रागा करून होय म्हणणारा हा देवीदास —हा कसला मर्द?

सारे विद्यार्थी मेघःशामला शिळपट म्हणत असत. त्याला प्रश्न पडला, आपण खरोखरच शिळपट आहोंत का?

त्यानें मनाचा निश्चय केला आणि तो लगेच अंमलांत आणला.

* * * *

पुनः कॉलेजांत खळबळ उडाली. देवीदासच्या प्रकरणावरच आधारलेली एक गोष्ट त्याच मासिकांत प्रसिद्ध झाली होती. पण देवीदासप्रमाणें ती टोपण-नांवानें लिहिली नव्हती. मेघःशामनें आपलें संपूर्ण नांव घालून ती गोष्ट लिहिली होती.

गोष्टीच्या शेवटीं त्यानें नलिनीच्या फाजिलपणावर आणि देवीदाच्या भेकड-पणावर सडकून कोरडे हाणले होते. नलिनीच्या बाबतींत तर चांगलीच कडक भाषा वापरली होती.

देवीदासला चप्पल मारल्यापासून नलिनी शेफारून गेली होती. पूर्वीची एकमार्गी वृत्ती सोडून ती आतां मोठ्या दिमाखानें साऱ्या स्त्रीपुरुष विद्यार्थ्यांत मिसळून आपल्या कर्तबगारीची शेखी मिरवूं लागली होती.

तेंच मेघःशामला आवडलें नाहीं. गुन्हा झाला, त्याची शिक्षा दिली, त्यानंतर मिटवामिटव झाली— एव्हढें झाल्यावर पूर्वीचा इतिहास विसरून जाऊन ती जर पूर्वीसारखीच वागत राहिली असती तर मेघःशाम गोष्ट लिहायच्या भान-गडींत पडला नसता.

पुनः प्रकरण विकोपाला गेलें होतें. पुनः साऱ्या मुलींनीं तसाच बेत करून मेघःशामला घेरलें. यावेळीं मात्र तो एकटा नव्हता. इतर बरेच विद्यार्थी बाजूला राहून पहात होते. मेघःशाम स्कॉलर असल्यामुळें त्याच्याबद्दल ज्यांना मत्सर वाटत होता अशा पुरुष विद्यार्थ्यांनींच नलिनी आणि तिच्या मैत्रिणींना खिजवून हा योग जुळवून आणला होता. तेच लोक गंमत पहायला बाजूला उभे राहिले

होते.

नलिनी आणि मेघःशाम यांचीं प्रश्नोत्तरें सुरू झालीं. नलिनी चवताळली होती आणि मेघःशाम धीमेपणानें उत्तरें देत होता.

" कुणी लिहिली ही गोष्ट ? "

" वर नांव आहे कीं ! "

" तें वाचलंय मी–पण कां लिहिलीत ही गोष्ट ? "

" पण कां लिहूं नये ? "

" आठवण नाहीं मागली--देवीदासची ? "

" म्हणूनच लिहिली. "

" अन् या लेखांत तुम्हीं मला मारकी म्हैस म्हटलंय–तरस म्हटलंय–अस्वलीणसुद्धां म्हटलंय."

" खरं आहे तें. " नाजूक हंसत मेघःशामनें उत्तर दिलें.

खाडकन् आवाज झाला—

आणि त्या आवाजामागूनच थाडथाड असे दोन आवाज झाले.

नलिनीनें मेघःशामला चप्पल मारल्याबरोबर त्यानें धडकावून तिच्या दोन थोबाडींत दिल्या होत्या. भेदरून सार्‍या मुली एकदम मागें सरल्या. जमलेले 'बघे' देखील चार पावलें मागें हटले.

दोघांचीही चांगलीच जुंपली. मेघःशाम नलिनीच्या वेणीचा शेपटा पकडून तिला गरगर फिरवीत होता आणि नलिनी तो हाताशीं येतांच त्याला टोसे लगावीत होती, ओचकारे काढीत होती–मेघःशामला वाटलें, तिनें एकदोनवेळां लाथाही मारल्या असाव्या.

दोघांच्याही मनांतील स्त्रीपुरुषभेद पार नाहींसा झाला होता. दोघेंही एकमेकांना सडकून तडाखे देत होतीं. त्यानें तिच्या झिंझ्या पकडल्या. ती त्याचा टाय धरून ओढीत होती. त्यांना सोडवायला पुढें जाण्याची कुणाचीच छाती होत नव्हती—तें दृश्यच असें होतें, कीं त्यांना सोडवायची कल्पनाच कुणाच्या मनांत येत नव्हती.

विद्यार्थी–विद्यार्थिनींचा घोळका सारा गोळा झाला होता. 'भले शाबास' म्हणून पुरुष ओरडत होते. 'मार मेल्याला!' म्हणून मुली ओरडत होत्या

एका मुलीनें आपल्या पायांतली चप्पल काढून मेघःशामाचा रोख धरून फेकली पण ती नलिनीलाच बसली. त्यामुळें नलिनी आणखी चवताळून मेघःशामाच्या चेहऱ्याला ओचकारे काढूं लागली.

कुणीच कुणाला हटत नव्हतें.

तितक्यांत प्रिन्सिपॉल आणि एकदोन प्रोफेसर धांवत आले. "मेंढ्याला मारलं नलिनीनं" म्हणून विद्यार्थी ओरडले. "नाहीं नाहीं. मेंढ्यानंच केली मारामारी सुरू" विद्यार्थिनी ओरडल्या.

त्या दोघांची झुंज सोडवायला गेलेल्या प्रिन्सिपॉल साहेबांनादेखील बक्षिस मिळाल्यावाचून राहिलें नाहीं. पण आपण ज्यांना बक्षिस दिलें ते प्रिन्सिपॉल आहेत हें जेव्हां त्या दोघांच्या ध्यानीं आलें, त्यावेळीं तीं दोघेंही वाजूला झालीं.

"पहिली आगळिक कुणाची ?" प्रिन्सिपॉलनीं विचारलें.

"आमची कांहींच तक्रार नाहीं !" दोघेंही एकदम उत्तरलीं.

"कम् ऑन् शेक हॅन्ड्स" नलिनी म्हणाली.

"देअर्स अ गुड **बॉय !**" मेघःशाम तिच्याशीं शेकहॅण्ड करीत म्हणाला.

प्रिन्सिपॉलसाहेब हंसले आणि दुसऱ्या प्रोफेसरना म्हणाले, "इथं आपलं कांहीं काम दिसत नाहीं. चला."

ते चार पावलें पुढें गेले नाहींत तोंच नलिनी ओरडली, "थांबा हं सर, आमच्या पार्टीला आमंत्रण देऊन ठेवतें !"

"कसली पार्टी ?" प्रिन्सिपॉलनीं विचारलें.

"पहिलाच मर्द दिसून आला या कॉलेजमध्ये त्याला पार्टी देणार आहे मी !–यायचं बरं सर."

* * *

फोटो घेत असलेल्या एका विद्यार्थ्याला सुनंदा म्हणाली, "आतां कसला घेतां फोटो ? असले फोटो घ्यायला फिल्म कॅमेरा हवा !"

---

# भरती–ओहट

लोक आपआपल्या परीनें कल्पना चालवीत होते. कुणी म्हणत सहा महि-न्यांपेक्षां जास्त लढाई चालणार नाहीं, तर कुणाची मजल वर्षापर्यंत जाऊन पोंचे.

लढाई वर्षापेक्षां जास्त चालेल असें त्या वेळीं कुणाच्या स्वप्नींहि आलें नव्हतें.

लढाईच्या गोष्टी जोंपर्यंत बोलल्या जात होत्या, वाचल्या जात होत्या तोंपर्यंत सारें ठीक होतें. लढाईचें क्षेत्र वाढत चाललें, मेसापोटेमियांत सैन्य पाठवावें लागलें, तेव्हांच लढाईची झळ इकडच्या माणसांना जाणवूं लागली.

इकडच्या माणसांना म्हणजे पांढरपेशा लोकांना नव्हे. पांढरपेशा आपल्याच मस्तींत तुस्त होता.

रिक्रुटभरती सुरू झाली होती. आणि त्याच्यासाठीं रिक्रुटिंग ऑफिसर खेड्यापाड्यांतून हिंडूं लागले होते.

लढाईची ज्यावेळीं वास्तपुस्तसुद्धां नव्हती त्यावेळीं सैन्यभरती करणे अशक्य नव्हतें. असा एक काळ होता कीं, पलटणींत नोकरी मिळण्यासाठीं 'रंगरूटवाला' आला कीं त्याच्याकडे वशिले लावले जात. पण आतां ज्या वेळीं प्रत्यक्ष लढाई सुरू झाली त्या वेळीं परिस्थिति बदलली. पलटणींत जाणें म्हणजे कवाईत करण्यासाठीं जाणें, गोळीबार करण्यासाठीं जाणें, वर्षानुवर्ष नोकरी केली कीं, ठराविक मुदतींतून वाढणारा पगार मिळविण्यासाठीं जाणें एवढाच त्यापूर्वीचा समज होता.

मधल्या काळांत रिक्रुटिंग बंद पडलें त्याचें कुणब्या मराठ्यांना वाईट वाटत असे—विशेषत: मराठ्यांना फारच. मराठ्याच्या बच्चानें नोकरी धरायची तर ती पलटणींतच, किंवा फार तर पोलिसांत—म्हणजे कुठल्याहि लढवय्या खात्यांत, असाच त्या वेळचा दंडक होता. मुन्सफ मामलेदार होण्याची कल्पना त्या वेळीं मराठ्याचा बच्चा डोक्यांत आणीत सुद्धां नसे.

बंद पडलेलें हें रिक्रुटिंग पुन: सुरू झाल्यानें अशा माणसांना आनंद झाला असता—पण हें रिक्रुटिंग सुरू झालें होतें लढाईवर जाण्यासाठीं—बराकींत जाण्याकरितां नव्हे.

प्रत्येक खेड्यांतून मोठ्या चमत्कारिक बातम्या येत होत्या. सैन्यभरती सुखासमाधानानें चालली नव्हती.

तो पेरणीचा हंगाम होता. माणसें शेतावर गुंतलीं होतीं. आणि इकडे रिक्रुटभरती सुरू होती.

बातम्या येत होत्या त्या मोठ्याशा समाधानकारक नव्हत्या. शेतीचें काम सोडून लढाईवर जायला तयार होता कोण? खुषी नव्हती म्हणून सक्ती केली जात होती. कांहीं ठिकाणीं मारामाऱ्या झाल्या. रिक्रुटिंग ऑफिसरला शेतकऱ्यांनीं कुठें कुठें चोप दिला आणि त्याचें फळ म्हणून त्यांना तुरुंगाची वाट धरावी लागली.

रिक्रुटिंग ऑफिसरला शेतकरी मारतात असें ज्या वेळीं बाबाजी शिर्क्यानें ऐकलें त्या वेळीं त्याला मोठी चीड आली. तो वयानें बराच म्हातारा झाला होता. त्याचें सारें आयुष्य शेतींत गेलें होतें. मराठ्याचा बच्चा. पण तरवार टाकून नांगर हातीं धरण्याचें नशिबीं आल्यामुळें त्याला दु:ख होत असे. दसऱ्याच्या दिवशीं मोडक्या तरवारींची पूजा करायची एवढीच काय ती शस्त्रांची ओळख. त्याला वाटे, तरुणपणींच आपण पलटणींत शिरलों असतों तर आज पेन्शनर सुभेदार होऊन आलों असतों.

त्याचा मुलगा देऊ म्हणजे गांवांतला एक जवान होता. मूळ पिंडाचा बळकट आणि बारमहा शेतावर राबणारा हा तरणाबांड पाहाणाराला एखादा पेहलवानासारखा दिसत असे.

बाबाजी देऊला म्हणे, " तूं या लोकांचं ऐकूं नकोस. हे लोक मोठे नादान

आहेत. भलभलत्या कंड्या पिकवतात. रंगरूटवाले इथं आले तर तूं खुशाल जा त्यांच्याबरोबरच. कांहीं कुणाचं ऐकूं नकोस."

देऊ हंसत असे. पण त्याच्या हृदयांत धडकी भरे. बाबाजी घरीं बसून राहिला होता. पण देऊला आठवड्याच्या बाजाराला जावें लागत असे. तिथें लढाईच्या बातम्या त्याला ऐकायला मिळत. रंगरूटवाल्यांचे चाळेहि त्याला तिथेंच कळत. लढाईवर जाऊन मेलेल्या माणसांचीं नांवें तिथेंच त्याच्या कानीं येत.

त्याला प्रश्न पडे, मरण्यासाठीं का लढाईवर जायचें ? मग जन्माला यायचं कशाला ? लढाईवर जाण्यांत नुसता काय पुरुषार्थ होता ?

देऊ जरा शिकलासवरलेला होता. मधूनमधून जोशीबुवांच्या घरीं येणारा 'केसरी' तो आणून वाचीत असे. त्या हकिकती वाचल्या म्हणजे त्याला बापाचें म्हणणें पटत नसे.

त्या वेळीं मोठा मतभेद माजला होता. पलटणींत जावें कीं जाऊं नये ? 'केसरीं'त त्याच्यावर लेख येत होते. या लढाईशीं आपला कांहींहि संबंध नाहीं. मर्दुमकी दाखविण्याचा काळ हा नव्हे. अशी चर्चा वर्तमानपत्रांतून चालली होती.

तसें कांहीं लिहिलेलें सांपडलें म्हणजे तें आणून तो बापाला वाचून दाखवी. तेव्हां बाबाजी म्हणत, "काय कळतं आहे या लोकांना ? रणांगणावर मरण आलें तर स्वर्ग मिळतो. हे ताकभातखाऊ लोक खोलींत बसून लांबलांब लेख लिहितात. मराठ्यांची मर्दुमकी त्यांना काय माहित ? तूं हें असलं कांहीं वाचूं नकोस. उगीच मन बिघडायचं त्यामुळं–"

यापुढें मन बिघडण्याचा प्रश्न देऊच्या हिशेबीं नव्हता. तो आधींच साशंक झाला होता. खोतांच्या घरीं तो कामाला गेला म्हणजे शेजारचे लोक तिथें बसून लढाईच्या गप्पा बोलत, त्या त्याच्या कानीं येत. जर्मनांची सारेच तारीफ करीत होते. सर्वांचा धुव्वा उडवून जर्मन लोक जिकडेतिकडे मोर्चे लावणार असें जो तो म्हणत होता.

एके दिवशीं त्यानें धीर करून विचारलें, तेव्हां खोत म्हणाले, "वेडा आहेस तूं देऊ. अरे, जिथं लढाई आहे तिथं माणसं हीं मरायचींच. जर्मन मर्दुमकी गाजवत आहेत खरे. पण त्यांचीं देखील माणसें मरतातच. आतां फ्रेंचांची

व बेल्जमचीं जास्त मरत असतील. पूर्वीच्यासारख्या का आतां लढाया आहेत ? माणसाला माणूस दिसत नाहीं म्हणतात. कुठून कशा गोळ्या येतात आणि कोण कसा मरतो हें कुणाला कळत सुद्धां नाहीं. पण एवढं खरं कीं, इतरांपेक्षां जर्मनांचे शिपाई अगदींच थोडे मरतात. इंग्रजांची अगदीं खात्री उडवून देतो जर्मनवाला–"

देऊचें असमाधान अधिकच वाढलें. इंग्रजांबद्दल त्याला मोठा आदर होता. साहेबांपुढें सर्व लोक कसे मान वांकवितात हें त्यानें पाहिलें होतें. मोठमोठे मुन्सफ मामलेदार ज्यांच्यापुढें माना वांकवितात ते साहेब देखील लढाईवर मरताहेत असें जेव्हां त्यानें ऐकलें तेव्हां त्याच्या काळजाचें पाणी झालें.

रंगरूटवाले एकदांचे आले. जिकडे तिकडे धांवपळ सुरू झाली. खुषीनें पलटणींत जायला कुणीच तयार नव्हता. जिकडे तिकडे उपासमार सुरू होती. पण प्रत्येकाला वाटे कीं, पोटाची आग विझविण्यासाठीं पलटणींत जाऊन कां मरायचें ? ही पलटणीची नोकरी तरी किती दिवस लाभणार होती ? दिवस पूर्वींचे नव्हते–पलटणींत जायचें तें लढाईसाठीं–मरण्यासाठीं–नोकरी करण्यासाठीं नव्हे. असेंच प्रत्येकाला वाटत असे. काय चारसहा महिने जातील तेवढाच पगार घरीं पाठवून कांहीं जन्माचें दारिद्र्य दूर होणार नव्हतें ! मग सैन्यभरतींत जायचें कशासाठीं ?

पण रंगरूटवाले खुषीचा सौदा थोडाच करीत होते ? धडधाकट माणूस दिसला कीं त्याला पकडून घेऊन जाण्यांत येत होतें. हातचा नांगर काढून घेऊन सरळ तरणे जवान रंगरूटच्या तळावर अडकून ठेवले जात होते.

गांवच्या लोकांनीं हातघाईवर येण्याचा प्रयत्न केला. पण पोलिसांपुढें त्यांचें कांहीं चाललें नाहीं.

रिक्रुटिंग ऑफिसरनीं आपली छावणी गांवाबाहेर ठोकली होती. सभोंवार खडा पहारा होता. एकदां छावणींत नेलेल्या माणसाला बाहेर येणें अशक्य झालें होतें. आपखुषीनें आल्याच्या अर्जावर सह्या आणि आंगठे सक्तीनें घेतले जात होते. पण तक्रार कुणाकडे करणार ? जिल्ह्याचे अधिकारीच जिथें सैन्यभरतीवर व्याख्यानें देत हिंडत होते तिथें फिर्याद न्यायची कुणाकडे आणि कसली ?

बाबाजी आपल्या मुलाला घेऊन स्वत: छावणींत आला तेव्हां रिक्रुटिंग

ऑफिसरला आश्चर्य वाटलें. तोंड फाटेपर्यंत त्यानें बाबाजीची स्तुति केली. बाबाजीच्या अंगावर मूठभर मांस चढलें, बांधून कुत्रा पारधीला पाठविण्यांत आला.

उघड बोलण्याची भीति नसती तर सर्वांनीं बाबाजीची छी: थू केली असती. जी काय चालली होती ती कुजबूज.

रंगरूटवाले निघून गेले. गांवांतले सगळे जवान त्यांनीं गोळा करून नेले.

शेतीचीं कामें हातातोंडाला आलीं होतीं. पण माणसें कुठें होतीं!

दुसऱ्याच महिन्याला घरोघर पगाराच्या मनिऑर्डरी आल्या. पण रुपये घेऊन काय चावायचे होते? साऱ्या गांवांची सारखी स्थिति. आजुबाजूच्या गांवांतून पैसे देऊन माणसें आणूं म्हटलें तरी माणसें होतीं कुठें?

पाऊस मोठा छान पडला. सैन्यभरतीपूर्वीच पेरणी झाली होती. पण तरवा लावायला माणसांचा तुटवडा पडला. बेणणीसुद्धां चांगलीशी झाली नव्हती.

घरोघरच्या लेकींसुनांनीं आपली पराकाष्ठा केली. पण तरण्या जवानांचीं कामे काय बायकापोरांना होतात?

माणसें असतीं तर चांगलेंच पीक पदरांत पडलें असतें. पण माणसांच्या अभावीं शेतें जागच्याजागीं तारवटलीं.

दर महिन्याला मनिऑर्डरी येत होत्या. म्हणून तरी घरांत दाणागोटा येत होता.

पण तेंच मोठें पाप झालें होतें. महिने महाल पैसा घरीं येऊं लागल्यामुळें शेतीची कुणाला पर्वा वाटेनाशी झाली.

बाबाजीराव म्हणूं लागला, "पहा आतां. मला नांवं ठेवीत होतां नाहीं का लेकांनो? आतां मनिऑर्डरवर आंगठे देतांना होते आहे का माझी आठवण?"

बाबाजीनें असें दरडावलें कीं लोक माना खालीं घालीत असत. दररोजच्या गरजा भागत होत्या. त्यामुळें शेतीची पर्वा कुणालाच वाटत नव्हती.

लढाईवरून पत्रें येत होतीं. पण त्यावरून कांहींच हकिकत कुणालाच कळत नव्हती. नुसती खुशाली असायची त्या पत्रांत.

कशीबशी शेतांची कापणी झाली. पण त्याची पर्वा होती कुणाला? काय आलें तें धान्य कुणी सांठवलें कुणी सावकाराला दिलें. उणीव पडली तिथें भरपाई

करायला हातांत खुळखुळणारे पगाराचे पैसे कसे निसटून जात होते हें कितीक दिवस कुणाला कळलें नाहीं.

शेतीचा दुसरा मोसम आला. त्या मोसमांत सारे असेच बेफिकीर होते. पगाराच्या मनीऑर्डरीची रक्कम वाढत होती. सारीं वडील माणसें मोठ्या खुषींत होतीं. मुलांकडून पत्रें येत होतीं कीं येत्या दिवाळीला आम्ही खास येऊं.

गेल्या वर्षापेक्षां चालू वर्षीं तर शेतीची फारच आबाळ झाली. पाऊसहि चांगलासा पडला नाहीं. शेतावर काम करायला माणसेंहि नव्हतीं. प्रत्येकाने कुणगे कमी केले होते.

पण मनिऑर्डरी येत होत्या त्यामुळें शेती बुडाल्याची कुणालाच पर्वा वाटत नव्हती.

सारे खुषींत होते खरे. पण हळुहळू पत्रांची दिरंगाई होऊं लागली. मनिऑर्डरी मात्र येत होत्या.

त्या मनिऑर्डरीहि एकदम थांबल्या.

वर्तमानपत्रांतून बसऱ्याच्या लढाईच्या भयंकर बातम्या येत होत्या. आजवरची खुषी विरघळूं लागली होती. जो तो चिंताक्रान्त झाला होता.

देऊचेंहि पत्र येत नव्हतें, म्हणून बाबाजी काळजींत होता. आतां कुणी त्याला विचारलें म्हणजे त्याची जीभ चांचरूं लागे. अभिमानानें फुगलेली त्याची छाती मागें जाऊन त्याच्या पाठीला पोंक येऊं लागलें होतें.

सैन्यभरतीचा अभिमान बाळगणारा काय तो बाबाजीच. जो तो त्याला फाडफाडून खात होता. पोराबाळांच्या खुशालीचें पत्र नाहीं, पगाराच्या मनिऑर्डरी नाहींत, माणसांच्या अभावीं शेती साफ बुडालेली आणि सावकाराचा इकडे तगादा लागलेला.

बाबाजी तरी बिचारा काय उत्तर देणार होता? सावकाराचें धरणें दारीं येऊन बसलें कीं शेजारीपाजारी त्याला मराठ्यांच्या मर्दुमकीची आठवण देत. त्याचा जीव मेल्याहून मेला होई.

सगळेजण दिवाळीची वाट पहात होते. पण लढाईवर गेलेल्या माणसांकडून मुळीं पत्रच येत नव्हतें. सावकार तरी किती दिवस स्वस्थ बसणार होतें? शेतें-जोतें जप्त केलीं जात होतीं.

पगाराच्या मनिऑर्डरी येऊन पैसे हातीं खुळखुळत होते तेव्हां सर्वांनाच एकप्रकारची मस्ती आली होती. त्या वेळीं शेतीची पर्वा कुणीच केली नव्हती. महिना भरतांच सावकारांच्या दांतावर पैसे हाणूं असें वरळणारी वाचा आतां लुळी पडली होती.

एके दिवशीं घरोघर सरकारी लखोटे आले. मोठ्या आशेनें प्रत्येकजण लखोटे घेऊन खोताच्या घरीं धांवत गेला.

एकएक लखोटा उघडून खोताचा 'इंग्रजीवाला' मुलगा वाचून स्वस्थ बसत होता.

बाबाजी ओरडला, "अरे दांतखिळी कां बसली तुझी? इकडे आमचा जीव कासावीस होतो आहे–तुला वाचतां तरी येतं आहे का?"

"वाचूं काय आणि सांगूं तरी काय?" खोताचा मुलगा कपाळाला हात लावून म्हणाला.

"म्हणजे आहे तरी काय त्या लखोट्यांत?" बाबाजीनें विचारलें.

एक पलटणची पलटण गारद झाली होती आणि लढाईवर गेले ते आणि नेले ते त्या गांवचे सारे जवान खतम् झाले होते.

घरोघर आकांत उडाला. जिकडे तिकडे रडारड सुरू झाली.

शहाणीं माणसें सांगूं लागलीं, "गेले त्यांचं सोनं झालं. लढाईवर देह ठेवला. स्वर्गप्राप्ती झाली त्या भाग्यवंतांना."

गांवच्या लोकांना वाटलें मेले ते भाग्यवंत खरंच. जिवंत होते त्यांचीच दैना उडाली होती. तेव्हां बेपर्वाई केली, आतां शेती गेली, शेत गेलें, नांगर बैल गेले–तरीहि कुणा कुणाला वाटत होतें–बाबाजीसुद्धां म्हणत होता—'गेले ते भाग्यवान.'

सर्वांना वाटत होतें बाबाजीच या साऱ्या दुःखाचें कारण. ते त्याला विचारीत, "हीच का ती मराठ्यांची मर्दुमकी? आता काय म्हणतो मराठ्याचा बच्चा? सावकारांनीं घर ताब्यांत घेतलं, शेत गहाण पडलं, शेती करायला माणसं नाहींत व आतां हा मर्द मराठ्याचा बच्चा काय करणार आहे?"

बाबाजीनें मान खालीं घातली. त्याचा अभिमान खाक झाला होता. खुषीनें त्यानें आपल्या मुलाला सैन्यांत पाठविलें होतें. बायको फाडफाडून खात होती.

शेजारी पाजारी त्याचे लचके तोडीत होते. इकडे उपासमारीचा प्रसंग आला होता.

हळुहळू मान वर करून त्यानें उत्तर दिलें, "काय म्हणावं हेंच मला कळत नाहीं. सैन्यभरती आली खरी पण माणुसकीला ओहट लागली. मला हेंच कळत नाहीं कीं मी मर्दाचा बच्चा कीं शेतकऱ्याचा पोर!"

प्रत्येकजण तोच प्रश्न एकमेकाला विचारीत होता. कुणालाच उत्तर देतां आलें नाहीं.

---

# खोताचें कूळ

करडा खोत म्हणून साऱ्या संगमेश्वर तालुक्यांत त्याची प्रख्याती होती. एक सद्गृहस्थ या नात्यानें तो पांढरपेशा समाजांत सज्जन माणूस म्हणून समजला जात होता.

इतर प्रत्येक व्यवहारांत त्याचें अंतःकरण भूतदयेनें भरलेलें असल्याचें जरी दिसून येत होतें तरी कुळांकडून वसुली करण्याच्या कामीं त्याची भूतदया त्याच्या व्यवहारी अंतःकरणाला पाझर फोडायला असमर्थ होती.

त्याचा मुलगा नुकताच बी. ए. होऊन कायद्याचा अभ्यास करूं लागला होता. कॉलेजांत असतांनाच कित्येक समाजवादी लोकांची आणि त्याची दोस्ती जमल्यामुळें नव्या कल्पना, नवे विचार, आणि ' नव्या जाणिवा ' यांची त्याच्या-ठायीं जागृति झाली होती.

बाप म्हणे, " हें पहा बाबू. तुला बोलायचं असेल तितकं बोल---पण तें इथं माझ्या खोतींत नको. कुळांसमोर नको. बोलायचं असेल तें आपल्या ब्राह्मणमंडळींत बोल. तूं दोन मुद्दे काढलेस तर त्यांना चार उत्तरं देऊन वर आणखी दहा मुद्दे काढायची ताकद आमच्या अंगीं आहे. या कुळांना तें कळत नाहीं. तूं काय बोलतोयस तें जिथं तुझं तुलाच कळत नाहीं तें या खुळ्याभोळ्या कुळांना कसं कळणार ? तूं बोलशील एक आणि ते समज करून घेतील भलताच. पण त्याचं फळ भोगावं लागेल मला. तूं काय म्हणतोस हें तुझं तुला तरी कळतं का ? "

बाबू म्हणे, " धनिक आणि दरिद्री या दोघांच्या संघर्षातून जे वाद उपस्थित होत आहेत त्याचा परिणाम आतां धनिकांना भोगावा लागणारच. तें आतां चुकणं नाहीं. "

बाप म्हणे, " अगदीं खरं बोलतोस, बाबा, अगदीं खरं बोलतोस! पण त्यांत थोडीशी चूक होतेय. धनिक धनिक कां नि दरिद्री दरिद्री कां, याच्या कारणाच्या मुळाशीं कधीं गेला आहेस का तूं? तूं बी. ए. कां झालास आणि गणू गमगव्याचा मुलगा कुदळ घेऊन जमीन खणीत कां बसलाय, याचा कधीं विचार केला आहेस का? " " तें मला कांहीं पहायचं नाहीं, " बाबू म्हणे, " वर्गकलहाच्या विरुद्ध आम्हीं लढा उभारला आहे. विरोधविकासवादाच्या पायावर आमच्या लढ्याचें अधिष्ठान आहे. म्हणूनच आम्हीं स्वयंपूर्ण भावनेनं जीवनाचीं मूल्यं ठरवण्यासाठीं अशिक्षित जनता प्रगतीच्या मार्गावर गतिमान कशी व्हावी, याचाच विचार करीत आहोंत. त्याच प्रचारासाठीं मला या किसानांना नव्या जाणिवेच्या पंचक्रोशींत खेचून आणायचं आहे. "

बाप म्हणे, " याच भाषेंत बोलतोस का त्यांच्याबरोबर? मग कांहीं हरकत नाहीं. मग वाटेल तेवढं बोल. हें एवढं बोललास त्यांतला एक शब्दसुद्धां जिथं मला कळला नाहीं तिथं तुझी ही भाषा त्या राम्यागोम्यांना कळायची मला मुळींच भीती वाटत नाहीं. खूप बोल बाबा, खूप बोल. असंच कांहीं तरी बोल. त्यांना समजेल असं कांहीं बोलूं नकोस. उघड उघड ' खंड देऊं नका ' वगैरे आत्मघातकी उपदेश करूं नकोस. हे कुळवाडी लोक मोठे धूर्त आहेत. मोठे मार्मिक आहेत—तुझ्यापेक्षांही जास्त अक्कलवान आहेत. चुकून एखादा मुद्याचा शब्द तुझ्या तोंडून गेला, तर तो तेवढाच पकडून तुझ्या या बापाचे दांत त्याच्याच घशांत घालतील! संघर्ष, नव्या जाणीवा, जीवनाचीं मूल्यं, गतिमानता, किसान आणि काबाडी, असलं काय वाटेल तें बोल. जे जे कांहीं तुझे वाद असतील त्यांची पोटभर चर्चा कर. तुला कांहींही वाटत असलं, तरी ते वाद जन्मभर मिटायचे नाहींत कीं तुटायचे नाहींत. ऐकलंस खोताच्या पोरा, बोलावं खूप—मोठे जाडे जाडे शब्द घालून बोलावं. शिक्षणाच्या गोष्टी बोलाव्या, स्वच्छतेच्या गोष्टी बोलाव्या, आरोग्याच्या गोष्टी बोलाव्या, राजकारणाच्या गोष्टी बोललास तरी सुद्धां माझी हरकत नाहीं. वाटेल तें बोल--पण खंडबंदीचं मात्र नांव

काढूं नकोस. तो नुसता शब्द जरी तुझ्या तोंडून निघाला तर मीही मरेन आणि तूंही मरशील. एवढं माझं सांगणं मात्र ध्यानांत ठेव. "

"हो--" म्हणून बाबू उगी राहिला.

पण त्याचें समाधान झालें नव्हतें. 'नव्या जाणिवां'नीं त्याचें अंतःकरण फुलून निघालें होतें. किसानांची पिळणूक होत आहे म्हणून जिकडून तिकडून ओरड ऐकूं येत होती. पांढरपेशे लोकच ती ओरड करीत होते म्हणूनच त्याचें अंतःकरण द्रवत होतें.

त्या दिवशीं तो गणू रामगड्याच्या घरीं गेला. खोताचा मुलगा आपल्या घरीं आला म्हणून गणूला आकाश ठेंगणें वाटलें. त्यानें त्याला बसायला आसन दिलें. आणि त्याच्या पायावर डोकें ठेवून त्यानें त्याला नमस्कार केला.

बाबूला भडभडून आलें. तो गणूला म्हणाला, "कशाला माझ्या पायां पडतोस गणू ? तुझा धोंडू आणि मी भारखेच नाहीं का ?"

गणू म्हणाला, "तें खरं खोतानूं, पण धनी तो धनी आणि चाकर तो चाकर. वाडवडलांच्या अमदानीपासून आम्हीं जोशांच्या खोतींत वाढलों. खोतांच्याच अन्नावर लहानाचे मोठे झालों. वय किती झालं तरी खोताघरचीं लेकरं आम्हीं. नि वय कितीही असलं तरी कुठलाही खोत आम्हांला वडील माणसासारखा. त्याच्या पायावर डोकं ठेवायचं नाहीं तर ठेवायचं कुणाच्या ?" असें म्हणून गणू त्याला घटकाभर थांबायला सांगून घरांत निघून गेला.

चौफेर नजर टाकून बाबू पहात होता. किसानाघरच्या दैन्याच्या ओंगळवाण्या गोष्टी त्यानें ऐकल्या होत्या. या घरांत किंवा घराच्या आजुबाजूला त्याला तसलें कांहींच दिसलें नाहीं. आंगण स्वच्छ सारवलेलें होतें. त्याच्यावर ठिकठिकाणीं रांगोळ्या घातलेल्या होत्या. वाळत घातलेल्या कपड्यांना ठिगळें लावलेलीं होतीं खरीं, पण तीं इतक्या कुशलतेनें शिवलेलीं होतीं कीं बारकाईनें पाहिल्याशिवाय तीं ठिगळें आहेत असें कुणाला दिसूनही आलें नसतें. बायकांचे सुताडे आणि पुरुषांचे मांजरपाट असले, जुनेपुराणे असले, तरी अगदीं स्वच्छ धुतलेले होते. मळणीच्या अंगणांत गवताच्या गंजी अगदीं नीटनेटक्या रचून ठेवलेल्या होत्या. दारांत पडलेल्या नांगरांचे फाळ पॉलिश केलेल्या पोलादी हत्यारासारखे चमकत होते. नांगराच्या दांड्यावर मातीचा एक टिपूससुद्धां दिसत नव्हता—

जगा कांहीं तो नांगर कधीं वापरलाच नव्हता! धान्याचे कुणगे रिते होते कीं भरलेले होते तें कांहीं बाहेरून पाहून कळत नव्हतें. पण त्यांच्या नीटनेटकेपणानें सारवून आणि वेलबुट्या काढून नटवलेल्या बाहेरच्या स्वरूपावरून अंतरांतसुद्धां समृद्धि असावी, असा भास होत होता.

समोरच्या गोठ्याकडे त्याची नजर गेली. त्या गोठ्यांत एवढीसुद्धां घाण दिसत नव्हती. बैलांच्या अंगावर शेणाचा एवढाही डाग दिसत नव्हता. त्या बैलांचीं हाडें बाहेर दिसत असलीं तरी समोरचें मूठपसा गवत चघळतांना उत्पन्न होणारें तृप्तीचें समाधान त्या जनावरांच्या चेहऱ्यावर स्पष्टपणें दिसत होतें.

त्याच गोठ्याच्या दुसऱ्या बाजूला गायींचा गोठा होता. पण ज्या जागीं बाबू बसला होता त्या जागेवरून गोठ्यांतल्या गायी दिसत नव्हत्या. बैलांची जिथें एवढी काळजी घेतली जाते तिथें दुभत्या गायींची आबाळ होत असेल अशी कल्पना कां करावी, असें बाबूला वाटलें.

रिकामी पाटी कांखेला घेऊन गणूची बायको बाहेरून आंत आली. आंत येतांच तिनें पाटी बाजूला ठेवून खोताच्या मुलाच्या पायांवर डोई ठेवली.

बाबू पुन्हा गहिवरला.

गणूची बायको नेसली होती तें लुगडें अगदीं नीटनेटकें होतें, तरीही बेमालुम शिवलेलीं ठिगळें कुठून तरी डोकावत होतीं. कोंकणच्या कुणब्यांच्या पद्धतीप्रमाणें मांडीपर्यंत पचाङ्ग मारून तिनें घट्ट कासटा खोंवला होता. कोपरभर चोळी, गळाभर पिरडुकांच्या माळा, मधून मधून चमकणारा एकादा सोन्याचा मणी, सोन्याची भुंग्या-सारखी नाकभर नथ, कानांत काप नि बुगड्या—सोन्याच्याच होत्या का त्या?—आणि तोंडभर हंसू घेऊन तिनें पायावरून डोई वर केली त्यावेळीं बाबूला कौतुक वाटलें.

तिचें वय त्याच्या आईइतकेंच होतें. तो मनांतल्या मनांत तुलना करून पाहूं लागला. नवऱ्याची जरब, पोराबाळांची पिरपिर, नोकराचाकरांचा गबाळेपणा वगैरे बाबींनीं कंटाळून त्रासिक झालेला, सोन्यामोत्यांच्या दागिन्यांनीं भरगच्च भरलेला, आपल्या आईचा त्रासिक चेहरा त्याला आठवला.

हातांत दुधाची चरवी घेऊन गणू आला आणि घासूनपुसून चकचकीत केलेल्या पंचपात्रांत दूध ओतून त्याला देऊं लागला, त्यावेळीं त्याचा प्रसन्न चेहरा पाहून बाबूच्या मनांत काहूर उठलें.

बाबू मुकाट्यानें दूध पीत असतांना त्याचा विचार सुरू होता. आपण आजवर ज्यांच्याबद्दल ऐकत होतों तीं हींच का दैन्यवाणीं माणसें ? दैन्याचें कुठें एवढेंसें लक्षणसुद्धां इथें दिसत नाहीं. जिकडे तिकडे स्वच्छता, नीटनेटकेपणा, प्रसन्न चेहेरे, हंसतमुखानें केलेला आदरसत्कार, तें पायावर डोई ठेवणें—सर्व कांहीं आठवून बाबूला वाटलें, आपली कांहीं तरी चूक होत आहे.

ज्या किसानांची दैन्यावस्था त्यानें त्याच्या सहकारी समाजवादी लोकांच्या तोंडून ऐकली होती ते किसान कदाचित् हे नसतील, अशीहि शंका त्याच्या मनांत आली. ती दैन्यावस्था कदाचित् उत्तर हिंदुस्थानांत असेल, खानदेशांत असेल, वऱ्हाडांत असेल, ज्या ज्या ठिकाणचे किसानपुढारी त्यांच्या दैन्यावस्थे-बद्दल ओरडत होते त्या त्या प्रांतांत असेल—पण तें प्रसन्न वातावरण पाहून त्याला वाटलें, कीं कोंकणांत तरी ही दैन्यावस्था नाहीं. कोंकणचा किसान सुखी असला पाहिजे.

तर मग काय त्याच्या बापाचें म्हणणेंच खरें होतें ? सुखी असलेले हे कोंकणचे किसान काय खोतांना नाडीत होते ? बुडवीत होते ? फसवीत होते ?

पुन्हां त्याला वाटलें, लुबाडणाऱ्या बुडव्यांचे चेहेरे असे नसतात. कुठल्याशा इंग्रजी ग्रंथकारानें म्हटल्याचें त्याला आठवलें, ' तोंडभर हंसला तरीही तो दुर्जन असूं शकतो. ' तसे हे तोंड भरून हंसणारे दुर्जन आहेत का ?

त्याचा विचार सुरू होता त्याच वेळीं गणूसुद्धां बोलत होता. तो जें कांहीं बोलत होता तें बाबूच्या कानीं गेलें नव्हतें. गणूच्या तें ध्यानीं आलें आणि तो म्हणाला, " माझं बोलणं जातंय का खोतांच्या कानीं ? "

" काय म्हटलंस ? " बाबू म्हणाला, " खरोखरच माझं लक्ष भलतीकडे गेलं होतं. पुन्हां सांग बरं. "

गणू बोलायला सुरवात करणार होता तोंच त्याची बायको एकदम ' अरे देवा ! ' म्हणून दचकून ओरडल्याचें त्यांच्या कानीं आलें.

दोघांनींही वळून पाहिलें. खोताचा कारकून बेलिफाला बरोबर घेऊन दारांत उभा होता.

बेलिफ मोठ्यानें ओरडला, " गण्या, चल, काढ हंडीभांडकीं बाहेर. जप्तीचं वॉरंट आहे तुझ्यावर. "

गणूचा हंसरा चेहरा बेलिफाला पहातांच जो पांढरा फटक पडला होता, तो बेलिफाच्या दरडावणीनें पुन्हा एकदम तांबडा लाल झाला.

"कसली जप्ती नि कसलं वॉरंट?" गणू दांत ओंठ खाऊन म्हणाला, "घरांत नाहींच कांहीं तर नेणार काय तुम्हीं? हीं नांगरटीचीं हत्यारं ना? तेवढींच राहिलीं आहेत–दोन बैल, दोन गाई आहेत–त्याही घेऊन जा! हा मी आहें, ही माझी बायको आहे. मुलगा बाहेर गेला आहे, तो येईल आतां. तिघांनाही घेऊन जा नि करा साऱ्यांचं लिलांव. पाहून देईन म्हटलं, तर पुरे बत्तीस दांतसुद्धां तोंडांत नाहींत. घर आधींच गहाण पडलंय. आतां काय घ्यायचं असेल तें घेऊन जा आणि त्याच्या बरोबरच्या आम्हां माणसांनाही घेऊन जा!" बोलत असतांना गणू थरथर कांपत होता.

दुधाचा पेला तोंडाशीं धरून बाबू विचार करीत होता. हें सारं खरं कीं नुसतं उसनं अवमान? कीं बेलिफाची फसवणूक?—कीं खोताला फसवायचा डाव?

"चल ग बाहेर—" गणू आपल्या बायकोकडे पाहून ओरडला, "काय असेल तें घेऊन जाऊं दे याला!" असें म्हणून बायकोचा हात धरून तिला ओढीत नेऊन तो अंगणांत बसला आणि तिथूनच म्हणाला, "दार मोकळं आहे, जा आंत आणि घ्या असेल तें!"

बेलिफ आणि कारकून घरांत शिरले. त्यांच्या पाठोपाठ बाबूही आंत शिरला.

आंत सारें स्वच्छ होतें–स्वच्छतेची अगदीं ओंगळवाणी परमावधी झाली होती. सारवून स्वच्छ केलेली जमीन, रंगवलेली आणि चितारलेली भिंत, प्रत्येक जागीं नीटनेटकेपणानें ठेवलेलीं मातीचीं हंडीमडकीं–तींही अगदीं बेतापुरतीं—कपडा तर कुठं दिसलाच नाहीं–दोन लंगोट्या एका दोरीवर वाळत होत्या तेवढ्याच!

बाबू चकित झाला. बाहेर प्रसन्नता होती–आंत भयाण शांतता नांदत होती—सुव्यवस्थित दैन्याचें गोजिरवाणें भयंकर स्वरूप सर्वत्र दिसून येत होतें!

त्या भयंकर स्वरूपाचा गोजिरवाणेपणा पाहूनच बाबूच्या हृदयाला धक्का बसला.

बेलीफ आणि कारकून हंडींमडकीं बाहेर काढीत होते. बाबु नुसता पहात

होता. त्यांना प्रतिकार करण्याची भावनासुद्धां त्याच्या अंतःकरणांत उत्पन्न झाली नाहीं.

तो भेकडपणा होता का ? निर्दयपणा होता का ? स्वतः बाबूलाच हा प्रश्न पडला होता. या दोघांचेही हात धरून त्यांना खेंचून बाहेर काढण्याची बुद्धि आपल्याला कां होत नाहीं ? खोताचें सावकारी रक्त त्याच्या नाड्या गोठवून टाकीत होतें काय ?

दसरा आणि दिवाळी मधला तो काळ होता. सोनें लुटणें मागें पडलें होतें. दिवाळी पुढें येणार होती-त्या सोन्याचा पाचोळा लुटण्याच्या काळानंतर दिवाळीचे बार उडण्यापूर्वीं, गणूच्या घरचीं हंडीमडकीं बाहेर येऊन दैन्याचें दिवाळें वाजलें होतें. आतां दैन्यसुद्धां शिल्लक राहिलें नव्हतें ! आज उद्यां कुणीतरी सावकार येऊन घराचा ताबा घेऊन जाणार होता.

बाबूला काय वाटलें कुणाला ठाऊक, त्याचें कारकुनाला विचारलें, " किती रक्कम होईल ? "

कारकून तिरस्कारानें म्हणाला, " एकशें सहुसष्ट रुपये बारा आणे नऊ पै."

" एवढेच ! " बाबू उद्गारला

" एवढेच कसले ? " कारकून म्हणाला, " आतां इथं आहे नाहीं तें सारं गोळा केलं तर यांतली चवथा हिस्सा रक्कमसुद्धां उभी रहायची नाहीं. आहे काय इथं ? आतां तेवढीं चार गुरं जप्त केलीं तरच काय चार पैसे मिळाले तर—"

" छे, छे ! " बाबू उद्गारला. त्याच्या अंगावर शहारे आले. गुरें जप्त करायचीं आणि माणसें सुद्धां करायचीं का ? बाबूच्या अव्यवहारी मनाला त्या प्रश्नाचें उत्तर देतां आलें नाहीं. एक शब्द सुद्धां तोंडाबाहेर काढण्याची बुद्धि त्याला होईना. त्याला वाटलें, बोलायचें काय ? कोर्टाची डिक्री मिळाली होती. ती डिक्री मिळाल्याशिवाय कांहीं दरखास्त मिळाली नसती—आणि म्हणूनच ही जप्ती आली.

मग आतां काय होणार ? गणू कुठं जाणार ? त्याची बायको कुठं जाणार ? धोंडी कुठं जाणार ? मुंबईंत जाणार का ? हे तिथं जाऊन काय करणार ? कुणा वाण्याच्या घरीं भांडीं घासणार, धुणीं धुणार, केर काढणार—एवढंच का करणार ?

जिथं नांगर नाहीं, कुळव नाहीं, आऊतं नाहींत—गुरंढोरं नाहींत, नांगरायला जमीन नाहीं, तिथं जाऊन हीं काय करणार ?

पुन्हां त्याच्या मनांत आलें. त्यानें पुन्हा कारकुनाला विचारलें, " हें सारं विकून पैशाची भरपाई झाली नाहीं तर काय करणार ? "

" खोताला वाटेल तें करणार ! " कारकून म्हणाला, " वाटलं तर सोडून देतील, नाहीं तर कुठं तरी जाऊन यानं नोकरी पत्करली कीं त्याच्या पगारावर बाकी वसुलीसाठीं टांच आणतील." असें म्हणून कारकून हंसला.

तें हंसणें बाबूला भेसूर वाटलें. पुन्हां त्याच्या अंगावर शहारे आले. ही रक्कम आपल्याकडे असती तर आपण यावेळीं देऊन टाकली असती का ? आपल्याकडे कशी असणार एवढी रक्कम ? बापच पाठवीत होता ना पैसे त्याला ? पैसे असते तर ते त्या खोताचेच ना ? तेच पैसे का त्याला पुन्हा द्यायचे ?

त्याला उत्तर सुचेना. तो गणूजवळ आला आणि म्हणाला, " एवढे पैसे माझ्याजवळ असते तर ते मी देऊन टाकले असते. पण माझी म्हणायला माझ्याकडे एक दमडी देखील नाहीं ! काय करूं ? "

" कांहीं करूं नका !" गणू म्हणाला, " बाळबुद्धी बोलते आहे ही. तुमचे वडील माझ्याबरोबर आंबराईत गोट्या खेळत त्यावेळीं आपल्या बापाला शिव्या देत म्हणत, " दया नाहीं आमच्या बाबांना; उगीच छळतात गरिबांना ! " त्याच खोतानं आतां ही टांच आणली. आतां हें तुम्हीं म्हणतां, उद्यां खोताच्या गादीवर बसलांत कीं आमच्या पोरांबाळांवर अशीच टांच आणाल ! " गणू क्षणभर थांबला आणि हातांतल्या चरवीकडे पाहून म्हणाला, " हें एवढं दूध राहिलंय तेवढं पिऊन जा. बामण माझ्या घरीं आला नि अर्ध्या भुकेनं गेला, असं नको व्हायला."

" नको, नको." बाबू उद्गारला. " कसं घेऊं हें दूध यावेळीं—"

" पिऊन टाका धडकन् ! " गणू म्हणाला, " लावा ही चरवी तोंडाला. रिकामी करून बेलिफाच्या हवालीं केली पाहिजे ती. दूध सांडायचं नसतं ना जमिनीवर !—"

नको नको म्हणून मान फिरवीत बाबू निथून बाजूला सरला. तें पाहून कारकुनाला खुणावून बोलावून गणू म्हणाला, " दोघंही एवढं हें दूध पिऊन टाका नि ही चरवी करा जप्तींत सामील ! " अन् तो मोठमोठ्यानें हसूं लागला.

पुन्हां बाबूच्या अंगावर कांटा उभा राहिला. तो देखावा त्याच्यानें पहावेना. त्यानें तडक घरचा रस्ता धरला.

*　　*　　*　　*

" वेडा आहेस बाबू ! " खोत म्हणाला, " तूं विसरतोस, कीं तुला वकील व्हायचं आहे. असल्या क्षुल्लक गोष्टी बघून जर तुझं मन विरघळूं लागलं तर पुढं वकिली कसली करणार आहेस ? हें असं चालायचंच. तूं या कुळवाड्यांना ओळखत नाहींस. मोठे बदमाष असतात लेकाचे. रडून दाखवतात उगीचच. आतां तूंच पाहिलंस ना ?—तुलाच दिसलं ना ?—इतक्या नीटनेटक्या घरांत मुलींच सामानसुमान कसं रे नाहीं ? यांतली मख्खी कशी कळत नाहीं तुला ? "

" कसली मख्खी ? " बाबू म्हणाला, " अगदीं उघड उघड दिसत होतं कीं घरांत हंडींमडकींसुद्धां पुरेशीं नव्हतीं. "

" अरे गाढवा, " खोत म्हणाला, " मुंबईला राहून अक्कल येत नसते. या खेड्यांत राबलं पाहिजे, डोळे उघडून बघितलं पाहिजे, उघड्या डोळ्यांनीं जें दिसत नाहीं तें डोळे झांकून अजमावलं पाहिजे. एवढं कसं कळत नाहीं तुला ? अशा टापटिपच्या संसारांत हंडींमडकींसुद्धां नाहींत यांतलं इंगित काय ? कळलं ? त्या चोरानं पुढला अंदाज करून सारं सामानसुमान आधींच लांबवून ठेवलंय ! कळलं ? अशी आहे त्यांतली मख्खी ! रडूनकढून पाह्यचं, आली दया तर दिल्या तुरी खोताच्या हातावर. नाहीं ऐकलं कुणीं, तर आहे आपलं सारं कांहीं कुठंतरी शाबूत ! असं आहे तें. चार दिवस केव्हांतरी खेड्यांत येऊन खेड्यांतलीं कुलंगडीं नाहीं कळायचीं तुला ! "

बाबूचें मन साशंक झालें. बापाच्या भाषणाचा त्याच्या मनावर थोडाबहुत परिणाम झाला होता. त्याला वाटलें, या भाषणांत कांहीं तथ्य आहे. खरेंच ? एवढें नीटनेटकें घर, रंगवून सारवून शोभिवंत केलेलें, त्या असल्या घरांत सामानसुमानाचा शुकशुकाट कसा ?

मुंबईहून येतांना त्यानें आपली सायकल आणली होती. सायकलवर बसून तो गांवाच्या शींवेजवळ आला. गणू, त्याची बायको आणि मुलगा तिघेंही चारदोन चिरगुटांचीं गांठोडीं घेऊन वाट चालत होतीं.

गणूला पहातांच तो सायकलवरून खालीं उतरला. पुन: गणूनें त्याला

नमस्कार केला पण त्याचें तिकडे लक्ष नव्हतें. तो म्हणाला, " ईश्वराला स्मरून खरं सांग गणू, तूं कुठं चालला आहेस ? "

" जिकडे वाट फुटेल तिकडे—" गणू म्हणाला.

" सामानसुमान कुठं ठेवलं आहेस तुझं ? " बाबूनें अगदीं सरळ सरळ विचारलें.

चकित होऊन गणू म्हणाला, " कुठलं सामानसुमान ? "

" हें बघ," बाबू म्हणाला, " माझ्याकडे कांहीं लपवूं नकोस. मी तुझा विश्वासघात करणार नाहीं. तुझं सामानसुमान जप्त व्हावं असं ईश्वरसाक्ष मला वाटत नाहीं. पण मला खात्री करून घेतली पाहिजे. एवढं तुझं सुंदर घर, एवढी ऐसपैस जागा अन त्यांत सामान मुळींच नाहीं हें कसं ? "

" काय सांगूं खोतानुं ? " गणू म्हणाला, " कोंकणच्या कुणब्याचं दुःख आहे तें इथंच. आम्ही शेतावरचे किडे-चिखलांत लोळतों असं वाटतं तुम्हां पांढरपेशांना—तें सुद्धां खरं आहे. शेताच्या सेवेंत आम्ही चिखलांत लोळतों—नि म्हणूनच आमचं घरटं बिनचिखलाचं कसं ठेवायचं म्हणून जीव टाकीत असतों. तो चिखल दृष्टीआड झाला कीं घर कसं आभाळच्या आंगणासारखं सुंदर दिसावला हवं म्हणून सारवून रंगवून सुंदर करतों. तोच आम्हां गरिबांचा आरसेमहाल. तेवढंच काय तें आमचं सुख. तुम्हां बामणांचीं घरंसुद्धां इतकीं निर्मळ सांपडायचीं नाहींत कधीं ! हेंच आम्हां कुळवाड्यांचं भूषण. एवढ्याच दागिन्याचं आमचं भाग्य. तें भाग्य तुम्हां बामणाच्या नशिबीं नाहीं म्हणून तुमचे डोळे फुटतात !—माफ करा हं ! तुम्हांला नाहीं म्हणत मी—मी म्हणतों आहें गांवच्या बामणसावकारांना. तें कुळवाड्याचं नीटनेटकं घर केव्हां एकदां चिखलमातीनं भरून काढीनं म्हणून मरत असतां तुम्हीं. आतां त्या माझ्या घराचा गोठा होईल ! माणसाच्या घरांत भुतं वागरूं लागतील ?—" बोलतां बोलतां त्याचा गळा दाटून आला. डोळे पाण्यानें डंवरले. डाव्या मनगटानें डोळे पुसून तो म्हणाला, " जा बाबा, जा. उगीच बोललों तुझ्यासंगं. कांहीं खरं वाटायचं नाहीं तुला. गरीब कुळवाड्याच्या शब्दाला मोल नाहीं. थोरामोठ्यांच्या पायाखालीं मरायचे म्हणूनच देवानं कुळवाडी घडवले. जा बाबा, जा. बोललों तें सारं विसरून जा. तुझ्या बापानं सांगितलं असेल तेंच खरं. सामानसुमान मी

सग्यासोयऱ्यांकडे नेऊन ठेवलं आहे. तिथं जाऊन आतां रामाचं राज्य करणार आहें. घर गोठा, गुरं, नांगर औत-फारं कांहीं बुचाडून घेऊन बसलांत. उरलीसुरलेली अब्रू–तीसुद्धां राहूं द्यायची नाहीं असंच जर म्हणायचं असेल तुम्हांला, तर तुम्ही धनी आहांत आम्हां गरिबांचे. उणं अधिक बोललों असेन तर माफ करा. मुंबईला जातों आहे मी. कधीं भेट झाली तर ओळख ठेवा या खोताच्या कुळाची!" असें म्हणून त्यानें पुनः एकदां त्याच्या पायाला हात लावून नमस्कार केला आणि 'चल ग, चल रे पोरा!' असं म्हणून बायको मुलाचा हात धरून ओढीत भराभर पावलें टाकीत, तो चालता झाला.

बाबू नुसता पहात राहिला होता.

शेवटपर्यंत हें कोडें त्याला उलगडलें नाहीं!

---



# जिव्हाळा

अबोल मुलगी म्हणून त्या कॉलेजांत क्षमेची प्रख्याति होती.

ती अबोल होती खरी पण अभ्यासांत तिचें पाऊल सर्वांच्या पुढें असे. मुकाट्यानें कॉलेजांत यायचें, व्याख्यान लक्षपूर्वक ऐकायचें, मुलींच्या खोलींत कुठेंतरी एकटेंच एका बाजूला बसायचें आणि शेवटीं एकटेंच घरीं जायचें, असा तिचा नित्यक्रम होता.

क्षमा सुंदर होती. पोषाखाची टापटीप नमुनेदार होती. रंगरोगण केल्या-शिवाय कुणाच्याही नजरेंत भरण्याइतकी आकर्षकता नखशिखान्त भरलेली, अशी ती एक कॉलेजकन्या होती.

अशा मुलीच्या सभोंवार खरें पाहिलें तर पुरुष विद्यार्थ्यांचा घोळका जमला पाहिजे होता. कॉलेजांतील मुलींत असलेली पुरुषांच्या डोळ्यांत भरण्याची आवड सर्वसाधारणपणें जी दिसून येते, त्या प्रकारची आवड तिच्या ठायीं नसल्यामुळें पुरुष विद्यार्थ्यांचा तिच्यावर राग होता.

आणि स्त्री विद्यार्थिनी तरी तिच्याबद्दल सहानुभूति कुठें बाळगीत होत्या ? कुणाशींच फारसा संबंध न ठेवण्याची तिची वृत्ति सर्वांच्या दृष्टीनें तिला अप्रिय ठरवायला कारणीभूत होत होती.

या मुलीला कशी पकडींत आणावी याचा प्रत्येक विद्यार्थी आपापल्या परीनें प्रयत्न करीत होता. पुष्कळांनीं या कामीं तिच्याकरवीं अपमान करून घेतला होता. फट्कन तोडून टाकून वाटेल त्याला वाटेल तें उत्तर अगदीं

नोजक्या शब्दांत देण्यांत तिचा हात कुणालाच धरतां आला नसता. म्हणूनच सारे विद्यार्थी चिडून उठले होते.

गॅदरिंग जवळ आलें होतें. त्या गॅदरिंगसाठीं एक नाटक करायचें ठरलें होतें. तें नाटक कॉलेजांतल्या एका विद्यार्थ्यानेंच लिहिलें होतें. हा विद्यार्थीसुद्धां एक अबोल विद्यार्थी म्हणून प्रख्यात होता. त्यानें केलेलें नायिकेचें वर्णन क्षमेशीं तंतोतंत जुळण्याइतकें अचुक होतें–किंबहुना क्षमेलाच नजरेसमोर ठेवून त्यानें हें नाटक लिहिलें असावें असा संशय तें नाटक पसंत करणाऱ्या प्रोफेसरांना सुद्धां आला.

त्या प्रोफेसरनीं शशिकांतला तसें विचारलें देखील. त्यावेळीं तो म्हणाला, "माझी नाटकाची कल्पना कांहीं तितकीशी स्वतंत्र नाहीं. एका रशियन नाटकाच्या संविधानकाचा आधार मी या नाटकासाठीं घेतला आहे. त्यांतील इतर भूमिका जरी पूर्णपणें स्वतंत्र असल्या, तरी मूळ नाटकांतील नायिका मात्र मला फार आवडल्यामुळं, मी जशीच्या तशीच ठेवली आहे. मी मूळ नाटकच आपल्याला दाखवतों म्हणजे माझ्या म्हणण्याचा प्रत्यय आपल्याला येईल."

प्रोफेसरनीं तें मूळ नाटक वाचलें त्यावेळीं शशिकांतचें म्हणणें सर्वस्वी खरें होतें असें त्यांना दिसून आलें. सार्वजनिकरीत्या या गोष्टीचा उल्लेख करून प्रोफेसरसाहेबांनीं शशिकान्तावर येत असलेल्या आरोपाचें निरसन केलें.

प्रत्येक विद्यार्थी तें मूळ नाटक मिळवून वाचूं लागला. संशयाला एवढी-सुद्धां जागा नव्हती. रशियांतल्या एका लेखकाला क्षमेचें चरित्र आणि चारित्र्य इतक्या अचूक रीतीनें कसें कळलें याचा प्रत्येकाला अचंबा वाटूं लागला.

ही महत्वाची चर्चा थांबली आणि खेळाचीं यादी लावायला सुरवात झाली. नायिकेचें काम क्षमेनेंच करावें असें सर्वांचें मत पडलें. पण तिला सांगायचें धैर्य एकालाही होईना.

शेवटीं हें प्रकरण प्रोफेसरसाहेबांकडे नेऊन त्यांच्या करवींच क्षमेची संमति मिळवावी असा ठराव सर्वानुमतें पास झाला.

अर्थातच प्रोफेसरसाहेबांनीं या प्रस्तावाला विरोध केला नाहीं. क्षमेला त्यांनीं सरळसरळ विचारलें.

नाटकाबद्दलची चर्चा साऱ्या कॉलेजभर होत होती. नायिकेशीं असणाऱ्या साम्यावर हजार प्रकारें शेरे मारले गेले होते.

क्षमेला हें सर्व माहित होतें. असें असूनही तिनें ज्यावेळीं ती भूमिका करायची संमति दिली त्यावेळीं सर्वांनाच मोठा धक्का बसला.

सर्वांनाच पहिल्यापासून खात्री नव्हती. कित्येकांना असें वाटत होतें, कीं दुसरी एकादी विद्यार्थिनी निवडून तिच्याकरवीं पूर्वी ही भूमिका करून घ्यायची आणि क्षमा कशी दिसते हें क्षमेला दाखवून द्यायचें—पुष्कळच या प्रस्तावाला अनुकूल होतें—पण आतां तिनें संमति दिल्यामुळें त्या लोकांचा डाव हुकला.

तालमी सुरू झाल्या. एका प्रख्यात नटाला हें नाटक बसविण्यासाठीं मुद्दाम बोलविण्यांत आलें होतें. त्यांनाही तें नाटक आवडलें होतें. सर्वांच्या दृष्टीनें या नाटकांत एक वैगुण्य होतें. नायिकेला बोलायला वाक्यें अगदीं कमींत कमी होतीं.

शिकवायला आलेले हे नट आधुनिक नाटकाचे अभ्यासू होते. जुन्या परंपरेचा त्यांना तिटकारा होता. म्हणूनच त्यांना ही भूमिका विशेष आवडली होती. वाचाळपणापेक्षां अभिनयकौशल्यावरच ही भूमिका रंगवली असल्यामुळें या शिक्षकाचें सारें लक्ष इतर भूमिकांकडून वळून या नायिकेवरच स्थिरावलें होतें.

क्षमेला शिकवण्याचे कामीं हे नाट्यशिक्षक जो भर देत होते तो पाहून विद्यार्थ्यांनीं टिंगल करायला सुरवात केली. अशानें चिडून जाऊन क्षमेनें ती भूमिका मधेंच सोडावी असाही कित्येकांचा उद्देश होता.

खुद्द नाटककारानें नायकाचें काम करावें अशी सूचना सर्वांनीं आणली. नायकाचें काम ज्याच्या वांट्याला आलें होतें तो आपलें काम शिकण्याऐवजीं क्षमेकडे नुसता पाहत राहत असे आणि शिक्षकाच्या सांगण्याकडे दुर्लक्ष करीत असे. ही तक्रार नाट्यशिक्षकांनींच केली होती.

शशिकान्तनें काम करण्याचें साफ नाकारलें. त्याला स्वतःबद्दल आत्मविश्वास वाटत नव्हता. आपल्या ठायीं रंगभयाची जाणीव आहे असें त्याला पुनः पुनः वाटत होतें.

शशिकान्तनें नाकारल्यामुळें तें काम एकामागून एक दोन तीन विद्यार्थ्यांना देण्यांत आलें. पण प्रत्येक जण तोच दोष दाखवूं लागला. जुन्या गॅदरिंगच्या

नाटकांत कामें केलेले आणि कसलेले असे समजले जाणारे जे कांहीं नट होते, तेही ही भूमिका करायला तयार होईनात. ती भूमिका घरच्या गड्याची होती आणि नायिका ही त्या घरमालकाची सुशिक्षित मुलगी होती.

जे काम करायला तयार होते त्यांना तें साधेना. आणि ज्यांना तें साधलें असतें ते काम करायला तयार होईनात, असा पेंचप्रसंग निर्माण झाला. नायिकेची भूमिका जितकी महत्वाची होती तितकीच या नायकाची--गड्याची होती. या गड्याची भूमिका तितक्याच कौशल्यानें वठवली गेली नसती तर नायिकेच्या कामालाही वैगुण्य आलें असतें. म्हणून नाट्यशिक्षक आतां नायिकेला सोडून नायकाकडे जास्त कसोशीनें लक्ष पुरवूं लागले होते.

त्यांचें समाधान होईना. कुणीच त्यांच्या पसंतीला उतरेना. कांहीं प्रसंग थोडेसे विलक्षण होते. त्या प्रसंगांचा प्रवेशक्रम आला त्यावेळीं हौसेनें पुढें आलेला तो विद्यार्थी सुद्धां माघार घेऊं लागला. नायिकेच्या पायांतले बूट काढणें, बुटांचे बंद बांधणें, नायिकेचें पातळ चुणून देणें, रागावलेल्या नायिकेच्या जरबेमुळें घाबरून हातांत झाडू घेऊन केर काढणें वगैरे प्रसंग असणारा प्रवेश आला आणि त्या प्रवेशांतील बारीकसारीक खांचाखोंचा दाखवून नाट्यशिक्षक जेव्हां त्या विद्यार्थ्याला रिंगणावर धरूं लागले तेव्हां त्यानेंहीं शेवटी तें काम करावयाचें नाकारून अवसानघात केला.

जवळजवळ बसत आलेलें नाटक टाकून द्यायचें कीं काय हा प्रश्न पुढें उभा राहिला. कुणी म्हणत, 'असे प्रसंग घालायचे तर ते घालणारानेंच करून दाखवावेत म्हणजे कसं वाटतं तें त्याचं त्यालाच जाणवेल !'

प्रोफेसरसाहेब संकटांत पडले. त्यांना तें नाटक आवडलें होतें. एक नवा नाटककार आपल्या विद्यार्थ्यांतून निर्माण होणार हें पाहून अभिमानानें ते सर्वत्रांकडे त्याची तारीफ करीत होते. अशा नाटकाचा प्रयोग झाला नाहीं तर आपल्या पदरीं नामुष्की येईल असें त्यांना वाटत होतें.

त्यांनीं पुन: प्रयत्न करून पाहिला. पुन: शशिकांतला विचारलें.

भूमिका पत्करावी असें मनांत वाटत होतें तरीही शशिकान्तला धीर होत नव्हता. आपलें कर्म आपणच निस्तारलें पाहिजे अशी जाणीव प्रत्येकजण त्याला

करून देत होता तेंही त्याच्या मनाला डांचत होते. इथे कुठेंतरी आपलें चुकतें आहे असें त्याला वाटत होतें.

तरीही ती भूमिका पत्करण्याचें धैर्य त्याला होईना.

सहजस्फूर्तीने क्षमेनें तें काम पत्करलें होतें. सामुदायिक कार्यक्रमांत आपण पिछेहाट घेतली असें कुणी म्हणू नये म्हणूनच ते काम करायला ती तयार झाली होती. पण नाट्यशिक्षकाच्या कौशल्यामुळें पायरीपायरीनें तिचें मन त्या भूमिकेंत रंगूं लागलें. लेखकाच्या जोरावर भूमिका यशस्वी झाली असतां त्या यशस्वितेचें श्रेय स्वतःच्या पदरीं बांधून घेण्यापेक्षां, स्वतंत्र रीतीनें अभिनयकौशल्य दाखवण्याचें साधन हातीं आलें असें दिसल्यामुळें तिला त्या भूमिकेबद्दल आपुलकी वाटूं लागली होती.

म्हणूनच ज्यावेळीं हें नाटक आतां टाकून देणार असें तिला कळलें त्यावेळीं एक प्रकारें तिला धक्का बसला.

कॉलेजांत आल्यापासून केव्हांही कुणाशींही ती आपणहून बोलली नव्हती. कुणीही कांहीं विचारलें तर तेवढ्यापुरतें अगदीं तुटक उत्तर देऊन निघून जायचें अशी तिची वृत्ति होती. अनेक प्रसंगी तिनें आपली ही वृत्ति बिघडूं न देण्याची पराकाष्ठा केली होती. तो अभिमान सोडून देण्याचा हा प्रसंग आहे असे तिला वाटलें.

तिला सांगण्याचें धैर्य कुणालाच झाले नसते. प्रोफेसरसाहेबांनासुद्धां झालें नसतें. तिच्या काटेकोर वागणुकीचा नाट्यशिक्षकाच्या मनावरही परिणाम झाला होता. अर्थात त्यांनींही तिला तसें कांहीं सांगितलें नसते. सर्वांनींच एक प्रकारें तिची जरब घेतली होती ती या नाटकाच्या तालमींनीसुद्धां दूर झाली नव्हती. आपल्या कामाखेरीज तालमीच्या वेळीं ती कुणाशीच बोलत नसे. कुठेंतरी एका कोपऱ्यांतल्या खुर्चीवर जाऊन बसे. इतर भूमिका करणारे विद्यार्थी आणि विद्यार्थिनी आपल्या भूमिकांच्या रचनेसंबंधीं नाट्यशिक्षकाबरोबर चर्चा करीत, त्या अनुरोधानें शशिकान्तालाही त्या चर्चेत भाग घ्यावा लागे. पण क्षमेनें मात्र केव्हांही कसल्याच गोष्टीची चर्चा केली नव्हती. मिलिटरींतील कडक शिस्तीनें वागणाऱ्या शिपायाप्रमाणें नाट्यशिक्षक जें सांगेल तें बिनचुक बजावण्यापलीकडे ती इतर कोणत्याच फंदांत पडत नव्हती.

पण त्या दिवशीं सारेच आश्चर्यचकित झाले. तालीम संपली, सर्वजण जायला निघाले, अशावेळीं ती शशिकांतसमोर आली आणि म्हणाली, " मला तुमच्याशीं कांहीं बोलायचं आहे."

शशिकांत थक्क झाला. बाकीचे लोक नुसते टकमक पाहात राहिले. नाट्यशिक्षक जायला निघाले होते त्यांना थांबवून क्षमा म्हणाली, " आपल्याशींही मला कांहीं बोलायचं आहे. आपणही जरा थांबा."

सारेच थांबले.

शशिकांत घवराट होऊन पाहात राहिला.

क्षमा क्षणभर थांबली आणि जमलेल्या साऱ्या मंडळीवर एकदां नजर फिरवून म्हणाली, " मला बोलायचं आहे नाटककारांशीं आणि या आमच्या शिक्षकांशीं. इतर कुणाचा त्यांत संबंध नाहीं."

" ठीक आहे. आम्हीं उगीच बसतों!" एक व्रात्य विद्यार्थी गंभीर-पणाचा आव चेहऱ्यावर आणून म्हणाला,

" ठीक आहे." क्षमा म्हणाली, " आपण इथं स्वस्थ बसा. मी या दोघांना घेऊन प्रोफेसरसाहेबांच्या खोलींत जातें. आपण कुणी तिकडे यायचं कारण नाहीं."

खुणेनेंच तिनें त्या दोघांना सुचवलें आणि चालायला सुरवात केली. दोघेही तिच्याबरोबर निघाले त्यासरशीं राहिलेल्या मंडळीनें टाळ्यांचा गजर केला.

नाट्यशिक्षक चिडले होते पण त्यांना नुसत्या खुणेनेंच उगी राहायला सांगून क्षमा त्या हॉलपासून दूर असलेल्या प्रोफेसरसाहेबांच्या खोलीकडे गेली. खोलींत येतांच तिनें दार लावून घेतलें.

शशिकांतच्या काळजांत धडकी भरली होती. नाटयशिक्षक देखील बरेच उत्सुक झाले होते.

एक क्षणभर तिघेही स्वस्त बसले. कुणीच बोलत नाहीं असें पाहून नाटयशिक्षक म्हणाले " आतां सांगा कां मला बोलावलं?"

एक क्षणभर थांबून क्षमा म्हणाली, " फार बोलायची मला संवय नाहीं. थोडक्यांत सांगायचं म्हणजे, हें नाटक मला आवडलं आहे. त्यांतली माझी

भूमिका तर मला फारच आवडली आहे. त्या भूमिकेंत माझा जीव गुंतून गेला आहे. असली भूमिका करायचं भाग्य लाभलं असतां तें हातचं निसटलेलं मला आवडणार नाहीं. माझ्या हातची गोष्ट असती तर त्यावेळीं मी वाटेल तो स्वार्थत्याग करून मिळतं घेतलं असतं. यांना—" शशिकान्ताकडे तिनें बोट दाखविलें तेव्हां शशिकान्त एकदम दचकला—" ही भूमिका निर्माण केल्याचं श्रेय नाहीं. पण नायक मात्र त्यांच्या कल्पनेंतून निघाला आहे. ती भूमिका निर्माण करतांना हें नाटक कॉलेजांतच केलं जाणार याची जाणीव त्यांनीं राखली पाहिजे होती. कॉलेजच्या वातावरणाची यांना कल्पना नाहीं असें मी तरी म्हणणार नाहीं. ही असली विलक्षण भूमिका निर्माण करण्याचा गुन्हा यांनी केला आहे. आतां हें पाप त्यांचं त्यांनींच निस्तारलं पाहिजे असं नाहीं कां आपल्याला वाटत ? "

" खरं आहे, खरं आहे." नाट्यशिक्षक म्हणाले, " मी तरी तेंच म्हणत होतों. पण हे घाबरतात त्याला मी काय करूं ? दररोज हे तालमीला हजर राहाताहेत. दररोज पाहताहेत. माझ्या शिकवणीची यांना आतां चांगलीच कल्पना आली आहे. मनाच्या उत्साहानं जर यांनीं हें काम पत्करलं तर या राहिलेल्या दहाबारा दिवसांत सुद्धां मी यांचं काम बसवून घेईन. त्यासाठीं आपण एवढ्याच प्रवेशापुरते स्वतंत्रपणें बसून स्वतंत्र तालीम घेऊं. यांनीं होकार द्यावा असं मलासुद्धां वाटतं."

—क्षणभर सर्व स्वब्धता पसरली.

शशिकांत विचार करीत होता. स्वतःच्या मनाशीं झगडत होता. होकार द्यावा असें त्याला वाटत होतें—नव्हे होकार त्याच्या ओठाशीं येत होता. पण त्याला धैर्य होत नव्हतें. पण त्यानें जे एकेक विलक्षण प्रसंग निर्माण केले होते ते वठवून दाखवल्यानंतर कॉलेजांतील विद्यार्थी आपली टिंगल करतील या भीतीनेंच त्याचें मन कच खात होतें.

तो एकदम दचकला.

" काय हो ! " क्षमा दरडावून म्हणाली, " लिहितांना बरं वाटलं. आतां कां माघार घेतां ? प्रसंग निर्माण करणं जितकं सोपं असतं तितकं ते वठवून

दाखवणं कठीण असतं हें आतां तरी कळलं का ? लेखकांचं चुकतं तें इथंच ! मनांत येतं तें लिहीत सुटतात. प्रयोगाचे वेळीं काय अडचणी येतील याची कल्पना नसते तुम्हां लेखकांना—"

" काय कठिण आहे त्यांत ? " शशिकांत चिडून म्हणाला, " भामिनी नाहीं का धैर्यधराचे जोडे झाडीत ? "

" किती चुकताहांत ! " क्षमा म्हणाली, " तिथं धैर्यधराचे जोडे भामिनी झाडते, भामिनीचे जोडे धैर्यधर झाडीत नाहीं आणि ते सुद्धां पुरुषच असत दोघेंही–अन् विद्यार्थीही नसत कॉलेजांतले. हें ध्यांनांत यायला पाहिजे होतं तुमच्या. नामुष्की पदरीं घ्यायची नसली तर मुकाटयानं काम करायला तयार व्हा पाहूं ! "

* * * *

दुसऱ्या दिवशीं तालमीच्या वेळीं सारे थक्क झाले. शशिकांत तालमीला उभा राहिला होता. ऐकून ऐकून त्याची नक्कल बरीचशी पाठ झाली होती. शिवाय त्या रात्रीं त्यानें नकलेवर बरीच मेहेनत घेतली होती. चंदू गड्याची ही भूमिका वाचाळाची होती. बोलायचा भाग त्याला पुष्कळच होता.

शिक्षकांनीं पहिला प्रवेश घेतला तो बुटांचे घेतला बंद बांधायचाच.

तो प्रवेश सुरू होतांच सर्वांनीं हिः हिः, खिः खिः करून त्याला घाबरवण्याचा प्रयत्न केला. एक गाणारा विद्यार्थी हळूच गाऊं लागला, ' मीच चुरिन चरण दास हो मी तुला.'

दुसरा उद्गारला, " पण प्रेमसेवा शरण कोण ? आणि कुणि कुणाला जिंकलं ? "

तिसरा म्हणाला, " आम्ही इतके कोकललों तें फुकट गेलं. कांहीं तरी घुडलं ठरलं आहे वाटतं ? "

तालीम सुरू होती तरीही शशिकान्तला ऐकूं जाईल असें, कुणि कांहीं कुणि कांहीं, परोपरीनें बोलत होते. विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं, या कामीं मुलीसुद्धां भाग घेत होत्या.

शिक्षक जितके करडे होते तितक्याच करडेपणानें त्या दोन्ही विद्यार्थ्यांनींही

लक्षपूर्वक आपली भूमिका बजावायला सुरुवात केली होती. त्या तिघांनाही कुणी कांहीं बोललें तरी ऐकूं येत नव्हतें. तिघांचेंही लक्ष आपापल्या भूमिकेंत रंगून गेलें होतें—शिक्षक शिकवण्यांत आणि तीं दोघें शिकण्यांत.

तो प्रसंग मोठा बहारीचा होता. सारीं कामें करीत असतांना चंदू गडी सारखा बडबडत होता. धनी—चाकराच्या नात्याची विचक्षणा करीत होता. त्याचा परिणाम क्षमेच्या मनावर होत होता. तिच्या दृष्टीनें तें नुसतें मुद्राभिनयाचें काम होतें. निरनिराळ्या भावनांची खळबळ तिच्या मनाला भंडावून सोडीत होती. जुन्या नाटककारानें अशा या प्रसंगीं जें लांबलचक स्वगत भाषण घातलें असतें तें न उच्चारतांच सारे विचार चेहऱ्यावर दाखवण्यांतच या भूमिकेचा उठाव होता, तें भाषण काय असेल याची सामान्य कल्पना करून शिक्षक तिला समजावून सांगत होते आणि स्वयंस्फूर्तीनें ती त्या सर्व भावना आपल्या मुद्रेवर अभावितपणें दाखवीत होती.

जोडी जुळली असें पाहून शिक्षकाला आनंद झाला. जोडी जुळली असें पाहून विद्यार्थीही उसळून उठले. परोपरीनें दोघांनाही सांगायला त्यांनीं सुरवात केली. जे विद्यार्थी शशिकान्तानें काम करावें म्हणून पहिल्यांदा गळ घालीत होते तेच आतां त्याची थट्टा करूं लागले होते. ते म्हणत, "शशिकान्तचा हा डाव होता. मुद्दामच त्यानं ही अशी भूमिका निर्माण केली. म्हणजे दुसऱ्या कुणी करूं नये आणि दुसऱ्यानं नाकारली म्हणजे शक्य तितके आढेवेढे घेऊन ती आपणच पत्करायची नी मग या उठवळ पोरीचे जोडे आपणच पुसायचे. भली शिक्षा होते आहे गुलामाला !—"

पुरुष विद्यार्थीच काय पण कांहीं मुलीसुद्धां या कार्यक्रमांत सामील झाल्या होत्या. तालीम संपली कीं शशिकान्ताला थांबवून त्या म्हणत, "जरा बंद बांधतां का बुटाचे !" दुसरी कुणी म्हणे, "गडी गेला आहे—जरा लुगडीं धुवायला येतां कां आमच्या घरीं ?"

शशिकान्तचा जीव बेजार झाला. सहनशक्तीची कमाल झाली होती. जळो हें नाटक आणि जळो ही भूमिका, असें म्हणून काम टाकून निघून जावें असें पदोपदीं त्याच्या मनांत येत होतें.

पण आतां त्याच्या हृदयांतला कलाकार जागा झाला होता. कलेच्या पायीं

होऊं लागलेला हा उपहास सहन करणें हळुहळु सुलभ होऊं लागलें होतें. चिडीची जागा संयमानें बळकावली होती.

छळ होत होता तो शशिकान्तचा, हें जरी खरें होतें तरी क्षमासुद्धां या प्रसंगांतून अजिबात सुटली नव्हती. तिच्या परीनें तिचीही थट्टा होत होती.

त्या दोघांनींही आपल्या स्वभावधर्माला अनुसरून उलट उत्तर देण्याचा केव्हांच प्रयत्न केला नाहीं. तरीही थट्टेची कमान दिवसेंदिवस जास्त जास्त ताणली जात होती. प्रयोगाच्या वेळीं दोघांनाही नामोहरम करायचें असा बऱ्याच विद्यार्थ्यांनीं कट केला होता. त्यांत विद्यार्थिनीही सामील होत्या. पुष्कळशा विद्यार्थिनींचा क्षमेवर पूर्वीपासूनच राग होता. त्याचें उट्टें काढायला ही संधि बरी आहे असें वाटून त्या या कटांत सामील झाल्या होत्या.

नाट्यशिक्षकांनीं आतां त्या दोघांना हाताशीं धरलें होतें. त्या दोघांच्या भूमिकांवरच त्या साऱ्या नाटकाचा उठाव होता. इतरांच्या भूमिका त्या मानानें कमी महत्वाच्या होत्या. पण त्यांतूनही कांहींचीं कामें नीट झालीं नसतीं तर या दोघांच्या कामाला वैगुण्य आलें असतें, हें ध्यानीं घेऊन शिक्षक जरी शेवटीं शेवटीं सर्वांनाच सारखे कसोटीला लावीत होते तरीही इतर विद्यार्थी आपल्या कामाबद्दल बरेंच दुर्लक्ष करीत होते.

या प्रसंगामुळें क्षमा आणि शशिकांत एकमेकांशीं बोलूं लागलीं. अर्थात ही चर्चा नाटकाच्या रचनेबद्दल किंवा भूमिकेच्या उठावणीबद्दल असे. पण त्याचा फायदा घेऊन विद्यार्थ्यांची टिंगल अधिकाधिक वाढूं लागली.

थोड्या दिवसांची बाब–पण शशिकांतला ती युगासारखी वाटली. केव्हां एकदां या दिव्यांतून पार पडतों आणि केव्हां प्रयोग पुरा होऊन मी बाहेर पडतों, असें म्हणत तो घटकापळें मोजीत होता. स्वभावाला अनुसरून तो दिवसेंदिवस खचत जात होता असें क्षमेच्या नजरेला आलें. पदोपदीं ती त्याला धीर देत होती. पदोपदीं ती त्याला सांवरून धरीत होती. टीकेच्या माऱ्याला तोंड देतांना आतां तिनें स्वत:चेंही तोंड उघडायला सुरवात केली होती.

पण त्याचा परिणाम अगदींच उलटा झाला. टीका कमी व्हायच्या ऐवजीं अधिकाधिक वाढूं लागली.

प्रयोगाला दोनच दिवस राहिले होते. त्या दिवशींची तालीम कसोशीनें घेतली जात होती. असें असतांना सुद्धां विद्यार्थ्यांनीं टिंगल करण्याची पराकाष्ठा केली. नाट्यशिक्षक चिडले असें पाहून क्षमेनें त्यांना आंवरून धरलें. कॉलेजच्या विद्यार्थ्यांची त्या शिक्षकांना कल्पना नव्हती. ते रागानें कांहींतरी बोलले असते तर प्रकरण विकोपाला जाऊन हातातोंडाशीं आलेलें नाटक ऐनवेळीं कोसळून पडलें असतें.

क्षमेचें प्रसंगावधान पाहून शिक्षकांप्रमाणेंच शशिकांतलाही तिच्याबद्दल आदर वाटूं लागला. तो इतका, कीं एकदां बाजूला घेऊन तिला त्यानें तसें बोलूनही दाखवलें. बोलतांना तो अगदीं घाबरला होता. त्याच्या तोंडांतून शब्द फुटत नव्हता. तो म्हणाला, " मला एक नवं शिक्षण मिळतं आहे. कल्पना करणं सोपं असतं पण अनुभवाचा फटका मोठा तिखट असतो. नाटक लिहितांना ही कल्पना मला नव्हती. या प्रयोगांतून मला नवी दृष्टि मिळाली. पण जोडीला तूं नसतीस—" तो घाबरला आणि जीभ चावून म्हणाला, " जोडीला तुम्ही नसतां—"

" पुरे झालं आतां हें तूं आणि तुम्ही ! क्षमा म्हणाली, " मला सुद्धां नवं शिक्षण मिळतं आहे या प्रयोगांत. नाटककार व्हायचं सामर्थ्य तुमच्यांत आहे—शंकाच नाहीं-पण नट व्हायचं सामर्थ्य—"

" माझ्यांत नाहीं का ?–खरं आहे तें. नाटककारापेक्षां नटाचं सामर्थ्य मोठं असतं हें आतां मला पटतंय. नटाशिवाय नाटककार पांगळा आहे—"

" आणि नाटककाराशिवाय नटालाही प्रकाश नाहीं हें तितकंच खरं नाहीं का ?" एक क्षणभर थांबून क्षमा म्हणाली, " ही नुसती सुरवात आहे. नट आणि नाटककार ही जोडी आहे. ही जोडी एका भावनेनं चालूं लागली तरच नाटकाचं गाडं सुरळीत चालेल. बी. ए. झाल्यावर काय करणार तुम्हीं ? नाटकं लिहिणार ? "

शशिकांतचा चेहरा गोरामोरा झाला. चांचरत चांचरत तो म्हणाला, " असा थोडासा आत्मविश्वास येऊं लागला आहे मला. पण–पण–तशीच नटी पाहिजे माझ्या भूमिका वठवायला. हल्लीं नव्या नव्या कल्पना मला सुचूं लागल्या आहेत. नव्या भूमिकांचीं चित्रं डोळ्यांपुढं नाचूं लागलीं आहेत. पण त्या प्रत्येक चित्रांत—रागावूं नकोस–मला तूं दिसतेस !—"

" थांबा ! " क्षमा म्हणाली, " आतां हें प्रकरण विकोपाला जाऊं पहातं आहे. असलं भलतंच कांहीं बोलूं नका माझ्याकडे. मला हें आवडत नाहीं.

*　　*　　*　　*

प्रयोग झाला. तो उत्कृष्ट वठला. थट्टा करायचा कट करून आलेले सारे कटवाले प्रयोगाच्या प्रभावानें पांगळे पडले. जुन्या नाटकाकारांनींसुद्धां अंतःकरण-पूर्वक शशिकान्तची तोंड फाटेपर्यंत स्तुति केली.

ती स्तुति औपचारिक नव्हती. आपली उसनंवारी शशिकांत विसरला नव्हता. त्याला बक्षिस देण्यांत आलें त्यावेळीं भाषण करतांना जाहीर रीतीनें त्यानें आपली ही उसनवारी बोलून दाखवली.

*　　*　　*　　*

त्या प्रयोगाचा मोठा वाईट परिणाम झाला. प्रयोगाच्या वेळीं स्वस्थ राहिलेल्या सहाध्यायी मंडळींनीं दोघांचाही पाठपुरावा करायला सुरवात केली. प्रसंगाच्या जाणीवेनें दोघांचीही सहानुभूति वाढूं लागली. सहानुभूतीच्या पोटीं जिव्हाळा निर्माण झाला.

शेवटीं व्हायचें तें झालें. शशिकान्त एक नांवाजलेला नाटककार म्हणून रंगभूमीवर येऊं लागला आहे आणि नटी म्हणून क्षमा असल्याशिवाय आपण नाटक लिहिणार नाहीं अशी त्याची प्रतिज्ञा आहे.

दोन अबोल माणसें रंगभूमीच्या बोलानें एका जागीं आलीं—नुसत्या निंदकांच्या बोलानें तीं कशीं दुरावतील ?

---

# रांगेचें राज्य

स्वतःच्या श्रीमंतीची तिला मोठी घमेंड होती. पण ती घमेंड बाहेर दिसूं न देण्याची ती अत्यंत खबरदारी घेत असे. श्रीमंत असली तरी ही बाई मोठी सज्जन आहे, मोठी वत्सल आहे, असें सर्वांनीं म्हणावें म्हणून ती आटोकाट प्रयत्न करीत असे.

अंतरांतल्या घमेंडीचा आणि बाहेरच्या विनयाचा मेळ घालतांना तिला मोठे श्रम पडत असत. वारंवार सकारण खरें खोटें बोलावें लागे, उलटे सुलटे डाव टाकावे लागत.

हे सारे प्रकार करतांना तिच्या मनाला मोठ्या यातना होत असत असं जर कुणाला वाटलं असेल तर तें चुकीचं होतं. हे सगळे उलटे सुलटे डाव टाकतांना तिला एक प्रकारचा कैफ चढत असे. त्या डावांत ती रमून जाई. त्या डावाच्या कैफांत ती आणखी डाव टाकी आणि ते फसले म्हणजे पुन्हां नवे डाव टाकायच्या तयारीला लागे.

एकूण काय, श्रीमंत असूनसुद्धां ही बाई मोठी निगर्वी आहे एवढंच प्रस्थापित करायची तिची धडपड होती. तिचा नवरा व्यापारी होता. त्या दुकानदारी वृत्तीमुळें उधळमाधळ करायला त्याची आडकाठी असे. तो कंजुष नव्हता, तसाच हाताचाही ढिसाळ नव्हता. पैसे मिळवतांना बेफाम पण खर्च करतांना मात्र कांटेकोर रहायचं अशी त्याची वृत्ति होती. म्हणूनच श्रीमंतीची घमेंड असतांनाही तिला खोट्या विनयाचें ढोंग करावें लागे.

गेलीं दहा वर्षे साळू त्यांच्या घरीं मोलकरणीचें काम करीत होती. एक गडी, पण तो बाजारहाट, झाडसारव, निरोप पोंचवणें वगैरे शिपाईवजा काम करण्यापलिकडे घरकामाला फारसा हात लावीत नसे. 'ओला' गडी असूनसुद्धां तो धुणींभांडीं वगैरे घरकामें करीत नसे. बाहेरचें काम बरेंच असल्यामुळें घरधन्यानें त्याला ही सवलत दिली होती. इतकीं वर्षे साळूनें त्यांच्या घरीं काढलीं, पण तिला सुखाचा शब्द असा कधीं ऐकूं आला नव्हता. धनीणीचा विनय, वात्सल्य आणि सज्जनपणा जो कांहीं होता तो इतरांसाठीं. घरच्या नोकरांना त्या तिच्या सज्जनपणाचा एवढासुद्धां आस्वाद कधीं चाखायला मिळाला नव्हता.

साळूला दुसरीकडे नोकरी मिळाली असती, नाहीं असें नाहीं.—कामाला तो मोठी व्यवस्थित असल्यामुळें कुणीहि तिला मोठ्या खुषीनें घरकामासाठीं ठेवून घेतलें असतें. पण या घरांत जितका पगार मिळे तितका पगार एखाद्या गुजराती बनियाच्या घरीं राहिल्याशिवाय मात्र तिला मिळाला नसता. आणि गुजरात्या-घरचें काम तर तिला जुन्या अनुभवामुळें पत्करत नव्हतें.

पगार मिळतो आहे ना, मग बोलेना का—असें म्हणून ती मनाचें समाधान करी. पण तें बोलणें काय थोडें होतें ? साऱ्या जगाशीं सौजन्यानें वागायचा प्रयत्न करतांना प्रमिलाबाईंना जो त्याग करावा लागे त्याचें उट्टें त्या साळूवर काढीत. जेवढें म्हणून कांहीं तिला घालून पाडून, टोचून बोचून बोलायचें असेल तेवढें त्या बोलून घेत. तें एक त्यांचें व्यसनच झालें होतें. साळूला टाकून बोलल्याखेरीज त्यांना अन्न गोड लागलें नसतें.

आणि आतां हे सरकारी निर्बंध सुरू झालेले. ठराविक दुकानावर गेल्या-खेरीज कांहीं कांहीं जिन्नस मिळत नव्हते. गडी बहुधा निरोपाच्या कामाला गुंतलेला. त्याला घरधन्याच्या दुकानावरून बऱ्याच ठिकाणीं खेपा घालाव्या लागत. झोळी घेऊन रांगेंत तिष्ठत बसायचें काम त्यानें दोनतीन दिवस केलें. पण पुढें त्यानें साफ सांगितलें कीं हें काम आपल्याकडून व्हायचें नाहीं. नोकरी सोडून निघून जायची त्याची तयारी होती.

प्रसंग असा बिकट होता कीं ठराविक कामासाठीं रुळलेला तो गडी जाऊं

देणें धन्याला परवडत नव्हतें. अर्थातच झोळी घेऊन रांगेंत उभें रहायचें काम करणें साळूच्या माथीं मारावें लागलें. रांगेंत उभें रहाण्याला कांहीं ताळतंत्र नसे. केव्हां जायचें, केव्हां यायचें हें कधींच ठरवतां येत नव्हतें. सरकारी दुकान ठराविक वेळीं उघडे. तें उघडायच्या पूर्वी घरचें सारें काम आटोपून झोळी घेऊन तिला रांगेंत उभें रहावें लागे. त्या रांगेंत ज्यावेळीं तिची पाळी येईल त्यावेळीं धान्य मिळायचें अन् मग तें घेऊन घरीं यायचें, घरीं आल्यावर वेळ लावल्याबद्दल धनिणीच्या शेलक्या शिव्या ऐकून पुन्हां कामाला लागायचें, या नित्यक्रमाला साळू कंटाळली.

काम करायला तिची नाखुषी नव्हती. मोलमजुरी करण्यासाठींच आपला जन्म आहे हें ती केव्हांच विसरली नव्हती. नोकरीच्या ठरावाप्रमाणें जीं कामें करायचीं त्यापेक्षां हें काम जास्त होतें. धान्य आणायचें काम पूर्वी गडी करीत होता, पण तें देखील त्याला उचलून आणावें लागत नसे. चिठी घेऊन दाणेवाल्याकडे जायचें आणि त्याच्या गड्याच्या डोक्यावर देऊन त्याला बरोबर घेऊन घरीं यायचें. तें काम चालू होतेंच. पण सारेच जिन्नस कांहीं आतां दाणेवाल्याच्या दुकानीं मिळत नव्हते. तांदूळ, डाळ साखरेसाठीं. सरकारी दुकानांत जावें लागत होतें. म्हणूनच श्रीमंतांची श्रीमंती राखण्यासाठीं साळूच्या हातीं झोळी आली.

तिचा नवरा कुठल्याशा ऑफिसांत पट्टेवाला होता. घरीं चार मुलें होतीं. भल्या पहाटे उठून नवऱ्यासाठीं भाजी भाकर करून ठेवायची, मुलांना कांहीं तरी पेजबिज करून द्यायची, शेजारणीकडे मुलांसाठीं कांहींतरी खाण्याचें देऊन ठेवायचें आणि दिवस उजाडायच्या पूर्वी प्रमिलाबाईच्या घरीं जायचें असा तिचा नित्यक्रम होता. दुपारीं तिथें तिला जेवण मिळे. पण ती तिथें जेवीत नसे. खरकटीं भांडीं, धुणीं वगैरे कामें उरकून जेवण झांकून घेऊन ती घरीं येई. तोंपर्यंत तिसरा प्रहर येत असे. मग थोडेंसें खायचें, थोडें मुलांना घालायचें, कांहीं बरेंसें वाटलें तर तें संध्याकाळीं येणाऱ्या नवऱ्यासाठीं राखून ठेवायचें. नवरा संध्याकाळीं येई त्यावेळीं स्वतःच जेवण करून मुलांना जेवायला घाली आणि आपलेंहि जेवण उरकून घेई. रात्रीचे नऊ साडे नऊ उलटल्यावर थंड

आलेलें जेवण घेऊन दुपारच्या प्रमाणेंच रात्रीं येऊन साळू घरीं जेवी, अन् त्यांतलेंच कांहीं बरें असलें तर मुलांना किंवा नवऱ्याला आग्रह करून पुन्हां खायला लावी.

पण या झोळीच्या जहागिरीमुळें तो साराच कार्यक्रम विस्कटला होता. दुकानावर जाऊन झोळी घेऊन केव्हांपासून केंव्हांपर्यंत उभें रहायचें याला कांहीं मर्यादा नव्हती. रोज उशीर होई आणि धनिणीचे बोल तिला ऐकून घ्यावे लागत.

तिचा जीव अगदीं टेकीला आला होता. हे सारे व्याप संभाळणें तिला कठीण जाऊं लागलें. नोकरी सोडावी म्हटलं तर एका माणसाचें दोन वेळचें जेवण, शिवाय चांगला भरभक्कम पगार, सणासुदीला मिळणाऱ्या गोडगोड पक्वान्नाची लालूच, मुलांच्या तोंडी मोठ्या घरचें पक्वान्न जाई ही आशा, तिला सोडतां येत नव्हती.

झोळी हातीं आल्यापासून तिला आणखी एक त्रास सुरू झाला होता तो आचाऱ्याचा. आचाऱ्याचीं कामें वेळीं होणें कठीण जाऊं लागलें होतें. धनिणी-बरोबरच आतां आचाऱ्याच्या शिव्या तिला ऐकाव्या लागत होत्या. किंबहुना हा शिव्यांचा भडिमार दोघांकडूनही सारख्याच प्रमाणांत जोरानें होऊं लागल्या-मुळें दिवसेंदिवस ती मेटाकुटीला येत चालली होती.

त्यांतच घरच्या प्रपंचासाठीं सुद्धां तिला पुन्हां मधल्या वेळांत झोळी घेऊन जावें लागत होतें तें वेगळेंच. कांदेवाडींतल्या खबदडींत एका अत्यंत जुन्या पुराण्या अशा ज्या चाळींत ती रहात होती तिथें अजूनही विजेचे दिवे आले नव्हते. धान्याबरोबरच घासलेट आणण्यासाठींही टिनपॉट घेऊन तिला जावें लागत असे. उभ्या दिवसतांत एका क्षणाचीही उसंत तिला मिळत नव्हती.

एके दिवशीं ती आजारी पडली. उन्हाच्या तिरपींत सारखें उभें रहाण्यामुळें उष्णतेच्या फटक्यानें तिला ताप आला.

प्रमिलाबाई भडकून उठल्या. बड्यापासून छोट्यापर्यंत सारे कारकून रजा घेतात पण या बिचाऱ्या मोलकरणीला इतक्या वर्षांत कधीं एक दिवससुद्धां रजा मिळाली नव्हती. आणि आतां ती आजारी पडल्यामुळें घरीं राहिली म्हणून

प्रमिलाबाईंना सांगायला ज्यावेळीं तिचा नवरा आला त्यावेळीं प्रमिला-बाईच्या तोंडून तिच्या बेचाळीस पूर्वजांचा उद्धार झाल्याचें त्या बिचाऱ्याला ऐकावें लागलें.

साळूनें मुद्दाम ढोंग केलें, झोळी घेऊन दुकानावर जायचें चुकवण्यासाठीं ढोंग केलें असेंच प्रमिलाबाईच्या मनानें घेतलें होतें. रोज झोळी घेऊन जायला साळू कंटाळत असे. मोठ्या कष्टानें त्या कामासाठीं ती जात असे हें ती रोज पहात होती. म्हणूनच तिला वाटलें कीं आज तिनें मुद्दामच आपलें काम चुकवलें.

गडी झोळी घेऊन जायला तयार होईना. आचारी म्हणाला, 'तें आपलं काम नाहीं.' आणि तो तर धान्य आणायचा दिवस होता. इतक्यांतच त्यांचा पूर्वींचा दाणेवाला आपलें दुकान बंद करून मुलखांत निघून गेला होता. कांहीं दाणेवाल्यांचीं दुकानें कशींबशीं उघडीं ठेवलीं जात होतीं पण तिथें जरूरीच्या तेवढ्याच वस्तु मिळत नव्हत्या.

आदळआपट करीत आचारी महाशयांनीं त्या दिवशीं नाइलाजानें हातीं झोळी घेतली.

कसाबसा तो दिवस निभावला. दुसऱ्या दिवशींहि साळू आली नाहीं. आणि आचारी महाशयांनीं झोळी घेऊन जायचें साफ नाकारलें. त्या दिवशीं प्रमिलाबाईंना गड्याच्या पायापडणीचा प्रसंग आला. मोठ्या मिनतवारीनें काकुळतीला येऊन गयावया करून ज्यावेळीं तिनें विनवलें तेव्हां कुठें झोळी घेऊन जायला गडी कबूल झाला. तोही कांहीं मोठ्या मुखासमाधानानं नव्हे. तो गेला नसता तर त्यालाच त्या दिवशीं जेवायला मिळालें नसतें.

धान्याची झोळी आणि घासलेटचा डबा आणून धनिणीच्या पुढें आपटून गडी म्हणाला, "हें काम आपल्या बापाच्यानंसुद्धां व्हायचं नाहीं. भर उन्हांत उभं रहायचं, पोलिसच्या शिव्या खायच्या. आम्ही गडी म्हणून लेकाचे आम्हांला फटकेसुद्धां मारतात. एकदां स्वतः जाऊन पहा बाईसाहेब. सगळ्या बायका स्वतः जाऊन धान्य घेऊन

येताहेत. थोरामोठ्यांच्या बायका असल्या म्हणजे पोलिस त्यांना त्रास देत नाहींत. आज त्या काळ्यापिवळ्या शिपायानं हा बघा माझ्य मानेवर फटका मारला हातांतल्या दंडुक्याचा. नोकरी गेली तरी बेहत्तर, मी उद्यां कांहीं झोळी घेऊन जाणार नाहीं. हवं तर तुम्ही जा, नाहींतर शेटला सांगा. नाहींतर हाच माझा राजीनामा. गिरणींत खूप नोकऱ्या मिळताहेत आतां—"

प्रमिलाबाईला संताप अनावर झाला. गड्याच्या तोंडचीं इतकीं बेमुर्वतीचीं उत्तरें तिनें यापूर्वीं कधीं ऐकलीं नव्हतीं. त्या संतापाच्या भरांत ती तोंड टाकून बोलली आणि गडीसुद्धां तितक्याच संतापाच्या भरांत रागारागानें निघून गेला.

दुपारीं धनी घरीं आले त्यावेळीं तिला कळून आलें, कीं झाल्या दिवसांचा पगार घेऊन गडी निघून गेला होता. आपल्याला विचारल्याशिवाय नवऱ्यानें त्याला जाऊं दिलें याची तिला चीड आली. ती म्हणाली, " घरीं काय चाललंय याची कांहीं दाद आहे का तुम्हांला ? साळू येत नाहीं, गडी निघून गेला; आतां ही झोळी घेऊन दुकानावर जाणार कोण ? तुम्हीं कीं मीं ? "

" कां ? भटजी आहेत ना ? "

सैंपाकघरांतून भटजींचा आवाज आला, " तें माझं काम नव्हे ! मी जेवण करीन अन् वाढीन—धान्य नसलं घरांत तर स्वस्थ बसेन ! जेवणाची तयारी नसली तर निघून जाईन ! "

दोघांचींही डोकीं भणाणून गेलीं. दोघेंहि डोकीं धरून एकमेकांच्या तोंडाकडे पहात स्वस्थ बसलीं होतीं असें पाहून भटजी म्हणाला, " आजच्या दिवस आणतों हवं तर. उद्यां मात्र जायचा नाहीं. उद्यांची काय वाटेल ती व्यवस्था करा. अन् आज धुणीभांडीं करणार कोण ? तें काम माझ्याकडून व्हायचं नाहीं हं ! "

शेजारच्या विमलाबाईंना सांगून त्यांच्या गड्याकरवीं त्या दिवसाचें काम कसेंबसें उरकून घेतलें. प्रमिलाबाई म्हणाली, " अलिकडे भारीच मस्तवाल झालीं आहेत हीं नोकरमाणसं. काम आहे का म्हणून रोज पंचवीसजण पूर्वीं विचारायला

येत. आतां गिरणींत नोकऱ्या मिळतात ना? पन्नास पन्नास साठ साठ रुपये पगार मिळतो म्हणे तिकडे. ऐकावं तें एक एक अजबच! आतां कशीं होणार ही घरचीं कामं? जळ्ळी मेली ही लढाई! नसते जंजाळ उत्पन्न झालेय. दुसरा काय उद्योग नव्हता या जर्मनांना? सुखानं घरीं बसून अन्न खाववत नव्हतं? लढाया करून काय ध्वजा लावणार आहेत? मेला तांदुळसुद्धां मिळेना धड! पैसे असले तरीसुद्धां मिळेना! घासलेटसाठीं कोण काकुळत्या कराव्या लागतात! अहो, काड्याची पेटीसुद्धां दुर्मिळ झालीय. कसली ही असली लढाई!''

तिच्या तोंडाचा पट्टा सारखा सुरू होता. शेजारीण मुकाट्यानें स्वतःचें काम करीत होती. ती गालांतल्या गालांत हसते आहे असें पाहून चिडून प्रमिलाबाई म्हणाली, "तुम्हांला हंसायला येतंय विमलाबाई, पण उद्यां काय करायचं याचा पेंच पडालाय मला. मेली पैशाला किंमतच कशी नाहीं ती! नी हीं चाकर माणसंसुद्धां भारीच मस्तवाल झालींय. म्हणे आतां त्यांचे दिवस आले आहेत. कुठं तरी पहाना एकादा गडी मिळाला तर. अशानं कांहीं निभायचं नाहीं. ती मेली साळू असती तर या गड्याची सुद्धां मी तमा धरली नसती. ती आजारी पडलीय. कुणाला ठाऊक, खरीच आजारी पडलीय कीं सोंग करतेय!—'' ती सारखी बोलत होती. मधेंच रागावत होती, केव्हां काकूळतीला येत होती–गळेपडणीला सुद्धां येत होती. भटजी बाजूला उभा राहून दांत बाहेर काढून हंसत होता. सहानुभूति दाखवायला तिथं कुणी सुद्धां नव्हतं!

तो दिवस कसाबसा निभावला. दुसऱ्या तिसऱ्या दिवशीं घरधन्यांनीं कुणातरी माणसाला पाठवून धान्य आणायची व्यवस्था केली. कुठेंच कुणी गडी मिळेना. साळू अजून आली नव्हती. तिच्या घरीं कुणी पाठवावें म्हटलें तर तिचें घर माहीत असलेला गडी निघून गेला होता. प्रमिलाबाईला वेड लागण्याची पाळी आली.

नवरा घरीं आला त्यावेळीं ती म्हणाली, "ही तुमची श्रीमंती घेऊन काय जाळायची आहे? पैसा असला कीं सारं कांहीं होतं असं तुम्ही म्हणतां. आतां त्या पैशाची उसळ करून का खायची आहे? चपातीसाठीं बँकबुक लाटून का भागणार आहे?–कीं नोटा खाणार आहांत चपात्या म्हणून? मी ही अशी घरीं

नसलेली—पंचवीस जणांकडे तोंड पसरतेंय, पण मेला कुणी गडीच सांपडत नाहीं. अशी त्या गिरण्यांत काय यांची वार पुरून ठेवलीय ? असे सारे गडी उठून जर गिरण्यांत जाऊं लागले तर हीं घरचीं कामं कोण करणार ? तीं तुमचीं दुकानं, तुमचीं बँक बुकं, नि तुमची श्रीमंती–कसली मिजास राहलीय आतां त्या श्रीमंतीची ? मजुरांचं राज्य म्हणून म्हणत होते त्याची ही सुरवात झाली आहे वाटतें !"—कुणीतरी मोठमोठ्यानें हंसल्याचा आवाज ऐकूं आला म्हणून तिनें मागें वळून पाहलें. शेजारचा गडी बाहेरच्या खिडकीचे गज धरून आंत पाहात मोठमोठ्यानें हंसत होता. ती चवताळून ओरडली, "हंसतोस काय मेल्या ! असला कुणी कुठं तुझा भाईबंद तर त्याला दे ना पाठवून !—नाहींतर तूंच कर आमचं काम. विमलाबाईच्या दुप्पट पगार देतें तुला ! मग तर झालं !"

तो गडी हंसला आणि म्हणाला, "मी नोकरी सोडली त्यांची !"

"अन् कुठं जाणार आहेस ?"

"गिरणींत !" असें म्हणून खो खो हंसत तो निघून गेला.

"गिरणींत ! गिरणींत ! ! गिरणींत ! ! !" प्रमिलाबाई मुठी आवळीत, दांत ओठ खात ओरडल्या, "जो उठला तो गिरणींत जातोय ! काय करणार आहेत गिरणींत जाऊन ! उद्यां लढाई संपली, कीं पुन्हां येतील मेले नाक घाशीत !"

"तें खरं !" भटजी खंवचटपणें हंसत म्हणाला, "पण आतां पुढं काय ? आज तांदूळ कोण आणणार ? तुम्ही भारीच कायद्याला भितां ? कोण कुठं येणार होतं पाहायला ? बेगमी करून ठेवली असती तांदळांची तर आज कशाला ही पाळी आली असती ?—"

"कळलं बरं मला !" ती तिरसटून म्हणाली, "मणीबेनच्या गड्यानेंच ना चुगली केली पोलिसांकडे ? एक आठवड्याची शिक्षा झाली तिच्या नवऱ्याला अन् शिवाय दंड ! नको ग बाई–त्यापेक्षां उपाशीं राहिलेलं पुरवलं !"

तितक्यांत साळू आली आणि तिच्या पायावर डोकें ठेवून म्हणाली, "आतां कांहीं माझ्यानं काम व्हायचं नाहीं. यापुढं डाक्टरनीं बंदी केलीय

गल्या दिवसांचा पगार घेऊन जायला माझे कारभारी येतील. उद्यां तेवढा देऊन टाका म्हणजे झालं !—" भटजीकडे पाहून हात जोडून नमस्कार करून ती म्हणाली, " येतें बरं भटजी, ओळखदेख ठेवा."

प्रमिलाबाई कांहीं बोलणार होती तोंपर्यंत साळू निघून सुद्धां गेली.

प्रमिलाबाईंना आकाश फाटल्यासारखें वाटलें.

पुन्हां त्या दिवशीं भटजीनींच दुकानावरून धान्य आणलें—" या उपर मुळींच जाणार नाहीं धान्य आणायला." असें बजावूनच त्यांनी ती कामगिरी केली होती.

दुसरा दिवस उजाडला. आतां उपायच नव्हता. शेजारच्या विमलाबाई-सुद्धां हातीं झोळीं घेऊन निघाल्या होत्या. त्यांना थांबवून प्रमिलाबाई म्हणाली, " थांबा हं, मी सुद्धां येतें ! " असें म्हणून ती झोळी घेण्यासाठीं आंत गेली.

शेजारणीकडे वळून विमलाबाई म्हणाल्या, " पहा हो हा श्रीमंतीचा दिमाख ! नाकानं वांगीं सोलीत होती–आतां आली की नाहीं झोळी हातीं ! "

दोघीही जाऊन रांगेंत राहिल्या. धक्काबुक्की करून विमलाबाई मधेंच कुठेंतरी पुढल्या रांगेंत घुसली. प्रमिलाबाईला तें कांहीं जमेना.

ती रांगेंत उभी राहिली. तिच्या मागेंच कुणीतरी फाटकं लुगडं नेसलेली ओंगळवाणी बाई उभी होती. तिला पहातांच प्रमिलाबाईला किळस आला. ती म्हणाली, " अग मागं हो ना ! दिसत नाहीं पुढं कोण माणसं आहेत तीं ? "

ती बाई म्हणाली, " दिसतंय कीं ! तुमच्या शेजारींच होतें मी कामाला. चांगली ओळखतें तुम्हाला. इथं कांहीं मिजास चालायची नाहीं तुमची ! माझ्या शेजारीं उभं राहायची लाज वाटत असेल तर जा मागं. अन् राहा उभ्या त्या रेशमी साडीच्या पारशांणी मागं."

प्रमिलाबाईंच्या अंगाचा भडका झाला. ती ओंगळवाणी बाई मुद्दामच तिला खेटून राहात होती. पुढेंहि तशीच कुणीतरी होती. पाहातां पाहतां बायका

बायकांत धक्काबुक्की सुरू झाली. अंगांत ताकद असलेल्या मोलकरणी पांढरपेशा बायांना मागें लोटून रांगेंतला पुढला टप्पा गांठीत जसजशा पुढें जात होत्या तसतसा प्रमिलाबाईचा नंबर रांगेंत मागें हटत होता.

वरून कडक उन्ह तापत होतें. पायांतल्या चपलांतून खालच्या तापलेल्या जमिनीचे चटके लागत होते. मागनं पुढून धक्काबुकी सुरू होती.

तितक्यांत काय झालें कोण जाणे. दोन तीन पोलीस शिपाई आरडा-ओरडा करीत हातांतल्या काठ्या फिरवूं लागले. त्यांतल्या एका काठीचा फटका प्रमिलाबाईच्या पायावर बसला. इतका वेळ तळतळत उभें राहतांना थकलेले पाय तिच्या ताब्यांत राहिले नाहींत. ती कोसळून फुटपाथवर पडली.

मागली रांग पुढें घुसली. तिला शेवटचा टप्पा गांठावा लागला. पुढली रांग पाहून तिच्या काळजानें ठाव सोडला. डोळ्यापुढें अंधेरी आली—हिरव्या पिवळ्या रेघा दिसूं लागल्या. गड्याला दिलेल्या शिव्या तिला आठवल्या. उशीर लावल्याबद्दल साळूची घेतलेली हजेरी तिला आठवली. श्रीमंतीचा दिमाख त्या फुटपाथवर कोसळलेला पाहून जीव तिळाएवढा झाला असें तिला वाटूं लागलें.

रांग सारखी वाढत होती आणि एकेक तिला मागें लोटीत होती. किती किती युगें आपण या रांगेंत उभ्या आहोंत असें तिला वाटलें.

तितक्यांत पुन्हा धक्काबुक्की सुरू झाली. पुन्हां पोलीस ओरडूं लागले. पुन्हां एकदां लाठी फिरली. पुन्हां एकदां तिला फटका बसला—

ती सावध झाली त्यावेळीं साळू तिला मांडीवर घेऊन बसली होती. त्या ओंगळवाण्या मोलकरणीनं तिच्या तोंडाशीं पाण्याचें भांडें धरलें होतें. आणखी कुणीतरी तसलीच कुळवाडीण तिच्या डोक्यावर आपल्या ओंगळ हातांनीं पाणी मारीत होती.

ती उठून बसली. चोहींकडे पाहूं लागली. सारी मुंबई भकास झाल्यासारखी तिला दिसत होती. जगावर वणवा पेटल्याचा भास तिला होत होता.

" उठा बाईसाहेब ! " साळू म्हणाली, " अन् जा घरीं. ती झोळी अन् पैसे द्या इकडे ! "

* * * *

ती घरीं आली त्यावेळीं तिचा नवराही घरीं आला होता. भटजी हात धरून चुलीजवळ बसला होता.

तिचा तो अवतार पाहून तिच्या नवऱ्यालासुद्धां हंसूं आलें.

ती भडकून उठली आणि म्हणाली, " हंसतां काय दांत बाहेर काढून ? एकदां त्या रांगेंत जाऊन उभे राहा म्हणजे समजेल तिथला इंगा. ती तिजोरी, तें दुकान, अन् ती तुमचीं बँक बुकं, सारीं गोळा करून द्या आग लावून अन् बसा शेकत त्या शेकोटीजवळ ! पैशाची किंमत आतां संपली !—" बोलतां बोलतां तिला रडूं कोसळलें.

तितक्यांत साळू आली आणि रिकामी झोळी पुढें ठेवून तिला म्हणाली, " दुकान बंद झालं. हे घ्या पैसे ! "

" मग आतां ! ! " ती आ वासून तिच्याकडे पहात उद्गारली, " आतां काय करणार आज ? "

आपली झोळी तिच्यापुढें ठेवून साळू म्हणाली, " हे तांदूळ मोठे आहेत. आजच्या दिवसापुरते हे चालतील तर बघा ! "

प्रमिलाबाईच्या डोळ्यांना टच्कन पाणी आलें.

" छे ! छे ! ते नकोत ! " मालक म्हणाले, " हे असले तांदूळ नाहीं चालायचे आम्हांला ! "

" मग काय करणार ? " प्रमिलाबाई चिडून म्हणाली, " उपाशीं रहाणार ?—" साळूकडे वळून ती म्हणाली, " ठेव ग ते तांदूळ तिथं. हें बघ—" साळूच्या पायाला तिनें हात लावला. ' हें काय ? हें काय ? ' असं म्हणत साळू मागें हटली तेव्हां डोळ्यांत पाणी आणून काकुळतवाणीनं ती म्हणाली, " पाठच्या बहिणीसारखं धांवत येऊन तिकडे मला सांवरलंस,

तशीच सांवरून घर मला. तुझ्या पायां पडतें. पुन्हां हें आपलं घर आपल्या ताब्यांत घे. तुझ्या औषधपाण्याची व्यवस्था मी करीन ! ''

" नाहीं बाई ! " साळू म्हणाली, " कारभाऱ्यांना तें पटायचं नाहीं. माझ्या पगाराच्या दुप्पट महागाई मिळालीय आतां त्यांना. आजच्या घडीला तुमची सेवा घडली तेवढी पुरे झाली. ती झोळी रिकामी करून द्या ना इकडं ! " असें म्हणून तिनें भरलेली झोळी पुढें केली !

" जळ्ळी मेली लढाई ! " असें म्हणत दातओंठ खात प्रमिलाबाईनीं झोळींतले तांदुळ सुपांत ओतून घेतले तेव्हां मळक्या पंचानें कांखा पुशीत भटजी ही ही करून हंसत होता.